


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन



अनुक्रमणिका








# दीपावली

विशेष विनोद अंक

मार्च १९६५ • वर्ष २१ • मूल्य १। रु.

घोडा काय सुंदर आहे, नाही.....?

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





व र्षा रं भ वि शे ष वि नो द अं क

# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

वर्ष २१ वें मार्च ६५ किं. १। रु.



## श्रेयनामावलि

● पुतळयाला शिक येते. अहो खरंच ! ! **[पुतळा-जयवंत दळवी]** लग्न मांडवांत [किती नंबरची कुणास ठाऊक !] बायको भेटते. म्हणतें घरीं या ऑफिस सुटल्यावर. आपल्या मुलीचा वाढदिवस आहे **[ स्त्री साम्राज्य-एक झलक-रमेश मंत्री ]** जत्रेंत बाई भेटते. बरं वाटतं. पण तो बाईचा घडा " गिरवाया लई कठिन " **[ बाई-रा. रं. बोराडे ]** आधीं केले थेर मग केलें लगीन. फ़ोटो काढायला गेलो अन्...**[थांब आजचे माऊली-पद्माकर गोवईकर]** अवघड झालेला "सीमा" प्रश्न कधींतरी असाही सुटतो **[ खंड्याची फ्री-स्टाइल-डॉ. बाळ गांगल ]** साला, ब्लॅक मनीची वार्ता 'वाघ'ला कोनी सांगितली ? **[ वाघच ! पण मिस्टर वाघ नव्हे-वसंत पुरुषोत्तम काळे ]** राणीच्या बागेंतील भला माणूस- **[ एक भला माणूस-श्रीराम कामत ]**-अभ्यास सोडून कांहींही शिकण्यासाठीं-**[ रिकामा** (न्हावी नव्हे !) **प्राध्यापक -डॉ. मनोहर मा. आळतेकर ]** पापड खा, लाटचा खा आणि तोंडी लावा- **[ लवंगी मिरची-डॉ. सरोजिनी बाबर ]** ह्या एकाहून एक सरस व तुफान हंसविणाऱ्या **कथा !**

● **पु. भा. भावे** ह्यांच्या **' उत्तर दिग्विजय '** ह्या गाजलेल्या प्रवास वर्णनाचा **अखेरचा** हप्ता-" जिंकू किंवा मरूं "

● **रंगभूमीवरील विनोद** ( वा. य. गाडगीळ ) **न्यायालयीन विनोद** ( यशवंत गोविलकर, वि. रा. भाटकर ) **महाविद्यालयीन विनोद** (माधव अत्रे)

● सन्मानपुष्पें, रंगमंच, चांदण्यांचें जग, दीपमाला, ऐसी अक्षरें रसिके मेळवीन हीं सदरें.

● एक नव्या वर्षाची खसखुशित भेट, **"बिंग चित्रमाला"** व इतर व्यंगचित्रें. **( पार्श्वसंगीत-नाटकांचें )**

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०-४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

टे. नं. ७७७६५

Gram : Dalalrt










अनुक्रमणिका

# ....पाथिक पाहतो स्वप्नें मोठी

**दीपावली**

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबावदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. दीनानाथ दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

**'दीपावली'**चा हा नव्या वर्षाचा पहिला अंक वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अतिशय आनंद होत आहे. हा आनंद केवळ आणखी एक वर्षानें आमचें वय वाढलें म्हणून केवळ झालेला नाहीं. तशी माणसाची इच्छा असो नसो, वय प्रतिवर्षी वाढतच असते. भोंवताली नको असले तरी गवत वाढतच असते. वाढण्याची प्रक्रिया सर्वच प्राणी सृष्टीत चालूंच असते. परंतु वर्षानें आम्ही वाढलो हें सांगतांना होणारा आनंद हा निर्मितीचा आनंद आहे. कलात्मक निर्मितीचा आनंद आहे. साधनेचा आनंद आहे. योजनेचा आनंद आहे. कुणाला कांहीं तरी बरें दिल्यानंतर जो आनंद माणसांना होतो त्या आनंदाची आणि आम्हांला झालेल्या आनंदाची जात एकच आहे. त्या आनंदमय भावनेनें आम्हीं आमचा एकविसाव्या वर्षाचा हा विशेषांक वाचकांच्या हातीं देत आहोंत. वाढदिवसाच्या दिवशीं आपण वाढलो ह्या प्रगतीच्या भावनेनें माणसें आनंदानें नाचतात, गातात. लौकिक सुख-दुःखाच्या अतीत जाण्याची किमया त्या दिवसाच्या सुवर्ण स्पर्शानें त्यांना साधते. "हाय रे दैवा, मी एक वर्षानें मृत्यूच्या अधिक समीप गेलो" असा विचार नतभ्रष्ट माणसांच्याच मनांत येतो. अशीं माणसें जीवनाला कधींच सामोरे जाऊं शकत नाहींत. हास्याच्या एका फार मोठ्या शक्तीला ते वंचित होतात. जीवनांतलें सौंदर्य त्यांच्यापासून अनंत योजने दूर पळत जातें. वाढदिवसाच्या कल्पनेंतला आनंद आणि सौंदर्याचा साक्षात्कार 'दीपावली'ला झालेला असल्यानें 'दीपावली'नें वर्षारंभ अंक "विनोद विशेषांक" म्हणून काढण्याची प्रथा चालूं ठेवली आहे. प्रस्तुतचा अंक आपल्या हातीं देतांना आम्ही हाच दृष्टिकोन ठेवलेला आहे. दीपावलीच्या वाढदिवसाचा हा समारंभ तुम्हीं साऱ्यांनीं अंकातल्या विनोदी कथा-लेख वाचून आणि पानोपानी, तुम्हांला हंसविण्याची प्रतिज्ञा करून उभ्या राहिलेल्या "शाब्दिक" आणि "सचित्र" विनोदाचा आस्वाद घेऊन साजरा करावा अशी सविनय प्रार्थना आहे. आपण घरोघरीं मोठ्यानें हंसलांत कीं, हा समारंभ यशस्वीपणें पार पडला असें आम्हीं मनोमन समजूं.

आम्ही मागें वळून पाहिलें. असें वळून पाहणें कुठेंतरी अशिष्टपणाचें असेलही, पण कलेच्या प्रगतीच्या संदर्भात मात्र हें मागें वळून पाहणें आवश्यक असतें. त्या दिसत असतात. आम्ही गेल्या वर्षांत काय काय साधलें ? कलेला आम्ही काय दिलें ? साहित्याला आम्ही काय दिलें ? 'जीवनदर्शना'ची साहित्याची प्रतिज्ञा आम्ही साहित्य देतांना कितपत पूर्ण केली ? अनेक प्रश्नें उरीं घेऊन आम्ही मागें वळून पाहिलें. "भीष्माचा डोंगर" ही श्रीराम कामत ह्यांची कादंबरी गेल्या वर्षी सुरूं केली होती. ती पूर्ण केली. पु. भा. भावे ह्यांची "उत्तर दिग्विजय" ही नवी प्रवासवर्णनात्मक व रोचक लेखमाला यंदा आम्ही दिली आणि ती ह्या अंकीं पूर्ण करीत आहोंत. त्या लेखमालेचें असंख्य वाचकांनीं पत्रें पाठवून स्वागत केलें. "ध्रुव ढळला" ही अनुवादित कादंबरी ही आमचीच कमाई आणि आम्हीं असें लिहितो ह्या नव्या मुलाखत–मालेंत सर्वश्री, पु. भा. भावे, अरविंद गोखले, पु. ल. देशपांडे, ह्या नामवंतांच्या मुलाखती देण्याची योजना आमचीच ! ह्या मालेंत मराठींतील अनेक नामवंतांची पानें मांडून ठेवली आहेत. कोण आहेत नि कोण नाहींत ह्या विषयींच्या तर्कास इतरांना वाव रहावा म्हणून सारींच नांवें आम्ही आज जाहीर करीत नाहीं. पण पुढील वर्षांत तीं नांवें 'फुटणार' असल्यानें अंक प्रसिद्धीच्या दिवसाची वाट पाहा !

अनेक नामवंतांच्या कथा, लेखांनीं आम्हांला वर्षभर साथ दिली. कांहीं नवे लेखक दीपावलीला गेल्या वर्षी मिळाले. नवे जुनें असा भेद दीपावली मानीत नाहीं. कलेच्या क्षेत्रांत कलेचेच निकष दीपावलीनें नेहमीच प्रधान मानले आहेत. साहित्य आणि संस्कृतीचें नातेंही दीपावलीनें नेहमींच गृहित धरलें आहे. त्या दृष्टिकोनांतूनच ह्या कला साधनेकडे आम्हीं पहात आलो आहोंत. गेल्या वीस वर्षांत हीच शिदोरी खांद्यावर घेऊन हा पथिक वाटचाल करीत आहे. त्याला मोठीं स्वप्नें दिसताहेत नव्या प्रतिज्ञांचे हुंकार ऐकूं येताहेत. सुमधुर सुरांची सुरावट त्याचा हा कलात्मक प्रवास सुखद व्हावा म्हणून साथ देण्याची हमी देताहेत. शब्दांची कुसुमें त्यांच्या मार्गांत पुष्पशय्या उभी करण्याचें आश्वासन देऊन बोलावीत आहेत. अनेक आनंदमय, प्रेरक शक्ति साद घालीत आहेत. आणि आपल्या सारख्यांचे आशिर्वाद देणारे हात तर नेहमींच समोर उभे आहेत. ते तसेच सदैव उभें रहावेत. आमच्या वाटचालींत तीच तर आमची खरी साथ ! तीच तर सच्चा दिलासा ! !






SHB2/NGB-80 B MAR

# बचतीच्या बाबतींत विचार करण्यांत तुम्ही पुष्कळ वेळ घालवतां काय?

नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज लहान बचतींना नेहमी प्रोत्साहन देते. तुम्ही रु. ५ नें सुद्धा खातें उघडूं शकतां.

नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेजच्या प्रत्येक शाखेंत तुम्हाला अनुकूल वातावरण मिळेल ते म्हणजे उत्तम सेवेचे.

म्हणून आजच तुमच्या जवळच्या शाखेची भेट घ्या आणि आमच्या येथें उघडलेला सेव्हिंग अकाउंट आणिबाणीच्या वेळी तुम्हाला कसा उपयोगी पडतो त्याचा अनुभव घ्या.

**तुमची ठेव कितीही लहान असो नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज तुमच्या सेवेसाठीं नेहमीच तत्पर असते.**



## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित : समासदांची जबाबदारी मर्यादित

**मुंबईतील शाखा** :—९०, महात्मा गांधी रोड ; २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लॉइड्स ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फिरोजशहा मेहता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लॉइड्स ब्रँच) ; ११७-११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५एफ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ ; २/५७१, गोआलिआ टॅन्क रोड, कम्बाला हिल ; शिवाजी मंदिर, न. चि. केळकर रोड, दादर ; २४बि, कल्ब रोड, भायकळा. **ठाणें** :—आग्रा रोड, कोलबाद रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).

**पांढऱ्या शुभ्र खादीच्या कापडांत गुंडाळलेला पुतळा हलूं लागला. त्यानें शिंकही दिली. घड्याळ चोरायला गेलेल्या माणसाचा विश्वास बसेना.**

**— कांहींतरी विचित्र वाटत होतं. असं कसं घडेल ?**
**असं कसं घडेल ? ? ?**

# पुतळा



**—जयवन्त दळवी**

स्थळ— माझें स्वत:चें घर.
वेळ— जातां जात नाहीं अशी.
प्रसंग— वेतणारा.

पडदा वर जातो. तो तर गेलाच पाहिजे. नाहीं तर मी बसलों आहे हें कसें दिसणार ? पडदा वर जातांच दिवाणखाना दृष्टीस पडतो. बहुतेक नाटकांत पडदा वर जातो तेव्हां दिवाणखाना दिसतो म्हणून हा उल्लेख. अन्यथा ही साधी खोली आहे. खोलीचा विस्तार जसें स्टेज मिळेल त्याप्रमाणें ! ही खोली सध्यां कमालीची अस्ताव्यस्त आहे. सध्यां प्रेक्षक हें नाटक पहात आहेत म्हणून ती सध्यां अस्ताव्यस्त आहे असें म्हटलें. एरव्ही ती नेहमींच अशी अस्ताव्यस्त असते. नाटकापुरती ती मुद्दामच व्यवस्थित केलेली नाहीं. कारण त्या अस्ताव्यस्तपणांतून मी अविवाहित आहे हें प्रेक्षकांना सूचित व्हावें हा उद्देश. अलिकडे नेपथ्यांतून कांहीं तरी सूचित व्हावें असा आग्रह असतो म्हणून ! अन्यथा मी अविवाहित आहे हें सूचित होऊन उपयोग काय ? असो.

तर, दिवाणखाना अस्ताव्यस्त आहे. दिवाणखान्यांत एकच पात्र आहे. आणि तें म्हणजे मी ! तें पात्र म्हटलें तरी मी पुरुषच आहे. माझें नांव राजाराम ! हें मुद्दाम सांगण्याचें कारण असें कीं पुढें येणारें आगाऊ पात्र मला राम्या अशी हांक मारील. त्यामुळें प्रेक्षकांच्या मनांत गोंधळ नको. मी मांडी ठोकून जमिनीवर बसलों आहे. त्यामुळें खुर्च्या, बांक, सोफासेट वगैरेंचा खर्च नाहीं. पूर्वी करमणुकीच्या करानें नाटकें मरत. आतां तीं सजावटीच्या खर्चानें मरतात. म्हणून हा एक अल्पसा उतारा. मी उघडाच बसलों आहे. कमरेला मात्र राजापुरी पंचा आहे. पण प्रत्येक वेळीं पंचाच पाहिजे असें नाहीं. जें वस्त्र उपलब्ध असेल तें चालेल ! उद्देश काय ? वस्त्राबरोबर आणखी वस्त्रांचें भाडें अंगावर नको. मी टकळी फिरवीत सूत कातती आहे. मी सूत कातती आहे म्हणून कमरेचा पंचा खादीचा हवा असें नाहीं. असला तर उत्तमच. तेवढेंच हस्तव्यवसायास उत्तेजन. पण वस्त्र खादीचेंच हवें असें नाहीं. असेल तें वस्त्र जुनें आणि मळकट असेलच. त्यामुळें तें खादीसारखें दिसेलच. आणि तसें दिसलें नाहीं तरी बाधा नाहीं. पण अंगावर, कसलें कां होईना, वस्त्र मात्र असावें.

दोन दिवसांनीं गांवांत गांधी जयंतीला महात्मा गांधींचा दगडी पुतळा उभारला जाणार आहे. त्या पुतळ्याच्या गळ्यांत फुलांचा हार घालण्यापेक्षां हातकताईच्या सूताची लड घालावी या उद्देशानें हा सूतकताईचा व्याप. शिवाय फुलांचा हार म्हटला म्हणजे प्रत्येक प्रयोगाला नवीन हार हवा. कारण आजचीं फुलें म्हणजे उद्यांचें निर्माल्य ! तेव्हां प्रत्येक वेळीं नवा हार विकत घेण्यापेक्षां एकदां सूताची लड केली कीं मग बघायला नको. शंभर प्रयोग झाले तरी.... शंभर.... उगाच वाचेंत दारिद्र्य नको !

मी सूत कातण्यामध्यें एक खास औचित्य आहे. मी रूपानें गांधीजी-सारखाच दिसतो. त्यांत माझी थोरवी नाहीं, किंवा गांधीजींना कमी-पणा नाहीं. ती एक योगायोगाची गोष्ट आहे. मी इतका गांधीजीसारखा दिसतो, इतका दिसतो कीं ते हयात असतांना मी कधीं त्यांच्या आसपास सुद्धां फिकरलों नाहीं. कारण, घ्या काय ? त्यांना पकडण्याचा हुकूम सुटतांच पोलीस मला पकडायचे, आणि त्यांना सोडायचे. गांधीजींची हत्या झाली तेव्हां तर गोडसेनें गांधीजींना मारण्यापेक्षां मला मारलें तर बरें झालें असतें अशी गांवांत हळहळ व्यक्त झाली होती. एवढें आम्हां दोघांच्यांत साम्य ! असो.

सांगण्याचा मुद्दा असा कीं माझी सूतकताई चालूच आहे. मध्येंच सूत तुटतें. मी तें पुन: जोडतो. आणि टकळी फिरवतो. प्रयोग लांबवायचा असला तर हें कृत्य पुन: पुन: करतां येईल.







अनुक्रमणिका

तेवढ्यांत खोलीचा दरवाजा वाजतो. माझ्याच खोलीचा. दारांत सीताराम उभा आहे. पायघोळ धोतर, अंगांतला तलम सदरा आणि गळ्याभोंवतीं गुंडाळलेला गरम मफलर या त्याच्या वेषावरून तो कंत्राटदार आहे हें सूचित व्हावें. सूचित झालें नाहीं तरी तो कंत्राटदार आहे हें लक्षांत घ्यावें. कुठलेंही कंत्राट असो, या सीतारामानें तें घेतलेंच, आणि पैसा केलाच म्हणून समजा. लग्नें ठरवण्यापासून तों तीं मोडण्या-पर्यन्त, मंडप घालण्यापासून तों ते मोडण्यापर्यन्त, सभा भरवण्यापासून तों त्या उधळून लावण्यापर्यंत कसलेंहि कंत्राट असो. सीतारामानें तें घेतलेंच म्हणून समजा. निवडणुकीच्या काळांत तो तेजींत असतो. एका पक्षाकडून सभा भरवण्याचें कंत्राट घेतो, तर तीच सभा मध्येंच उधळून लावण्याचें कंत्राट दुसऱ्या पक्षाकडून घेतो. थोडक्यांत म्हणजे या पात्राचें व्यक्तिमत्वच कंत्राटी. गांवांत गांधीजींचा पुतळा उभारण्याचें कंत्राट सुद्धां त्याच्याकडेच आहे. अर्थांत हें आधीं सांगून उपयोगाचें नाहीं. तें डायलॉगमधून कळेलच.

सध्यां तो सीताराम दारांत उभा आहे एवढें कळलें तरी खूप झालें. तेवढें कळावें म्हणूनच तो दरवाजावरली कडी वाजवतो आहे. तसें पहातां खोलीचें दार तर उघडेंच आहे. त्याला सरळ आंत येतां येईल. तरीहि आपण आलों आहे हें मला व प्रेक्षकांना कळावें म्हणून तो दार वाजवतो.

"कोण आहे ?"

कोण आहे हें मला सुद्धां माहीत असतें. पण नाटकाला सुरुवात व्हावी म्हणून मला तसें विचारावें लागतें. तसें विचारलें नाहीं तर त्यालाहि सारखी कडी वाजवीत रहावें लागेल.

"मी आहे !"

तरी मी सूतच कातता. वर बघत नाहीं. कारण वर पाहिलें तर दारांत कोण आहे तें मला कळेल. आणि तसें कळलें तर मला पुढला संवाद गाळावा लागेल. आणि संवाद गाळण्याचें धोरण नाटकाला मारक असतें.

"कोण ?"

"मी सीताराम !"

"वाः वा : ! अरे सीताराम, ये – ये ना आंत–"

सीताराम आंत येतो. ये-ये ना आंत असें मी म्हटल्यावर सीतारामानें आंत यावें हें सभ्यतेला धरूनच आहे. पण त्याला बसायला कांहीं मिळत नाहीं. त्यामुळें तो उभाच रहातो. पात्र उभें असलें म्हणजे त्याला अभिनयाला वाव मिळतो. बैठक मारली म्हणजे अभिनयावर बंध पडतात. सध्यां मी बसलेला असलो तरी योग्य वेळीं मीहि नाट्यमय रीतीनें उठणारच आहे. तर सीताराम उभा आहे. पण पुतळ्यासारखा उभा नाहीं. तो खोलीभर फिरतो आहे.

"काय चाललें आहे ?"

हा सीतारामाचा प्रश्न ! वास्तविक सूतकताई चालू आहे हें सीतारामाला दिसतेंच आहे. तथापि डायलॉग चालू व्हावा म्हणून तो हा प्रश्न विचारतो. आणि प्रश्नाला उत्तर हें हवेंच !

"सूत कातता आहे !"

"सूत ? आणि तूं ?"

हा संवाद वाढविण्याचा प्रकार !

"कां ?" हाहि तोच प्रकार !

"सूतानें आतां कुठला स्वर्ग गांठणार आहेस ?"

इथें कुणाला हंसायचें असलें तर हंसतां येईल.

"अरे सीताराम, गांधीजयंती जवळ आली ना ?"

"तूं गांधीजीसारखा दिसतोस हें मला माहीत आहे. पण तूं गांधीभक्त केव्हांपासून झालास ?"

"वा : ! मी गांधीभक्त आहेच !"

"मग खादी कुठं वापरतोस ?"

"ती परवडत नाहीं !"

"मौन कुठं पाळतोस ?"

"प्रसंग पडला तर पाळतो."

"आणि अहिंसेचं काय ?"

"आमच्या हातून कोण मरणार ? फार तर ढेकूण किंवा डांस !"



दीपावलीची

# सन्मान पुष्पें

## यंदाच्या गणराज्य दिनाचे नवे मानकरी



पद्मभूषण शंतनुराव किर्लोस्कर

**प्रतिवर्षी** २६ जानेवारीला गणराज्य दिन साजरा होतो. त्याचें स्वरूप आतां निश्चित झाले आहे. उणीव फक्त रोषणाईची आणि मेजवान्यांचीच भासते ! बाकी राष्ट्रपतींचा व पंतप्रधानांचा संदेश, लालकिल्ल्यावरील संचलन व भाषण, ह्या सोपस्काराबरोबर आणखीही एक कार्यक्रम प्रतिवर्षी उरकला जातो. तो म्हणजे सार्वत्रिक पदवीदानाचा ! राजेशाहीतील हा पायंडा लोकशाहींतही आवश्यक ठरला आहे. कारण राज्यशासनाची पद्धत बदलली असली तरी माणसाचें मानसशास्त्र बदललें नाहीं. आणि तें बदललें नाहीं ह्याची जाणीव ठेवूनच राज्यशासन हा सोपस्कार 'नेमेचि' साजरा करीत आहे. यंदाही तो साजरा झाला आणि त्या वर्षीच्या मानकऱ्यांत विविध क्षेत्रांतल्या नामवंतांचा समावेश झालेला पाहून मनाला बरें वाटलें. महाराष्ट्रांतील बरीचशी कर्तबगार, गुणी माणसें त्यांत आहेत ही गोष्ट नमूद करतांना बहुत आनंद होत आहे. कर्तबगार उद्योगपति **शंतनुराव किर्लोस्कर**, सांगलीचे राजेसाहेब श्रीमंत **आप्पासाहेब पटवर्धन**, विख्यात गणिती **डॉ. जयंत नारळीकर**, ह्या मंडळींचा पद्मभूषण हा मानाचा किताब देऊन गौरव करण्यांत आला. बंगालचे एक श्रेष्ठ चित्रपट दिग्दर्शक, निर्माते **सत्यजित रे** ह्यांचेंही नांव त्यांत आहे. सत्यजित रे हे केवळ बंगालचे भूषण राहिले नाहीं. त्यांचे सर्व चित्रपट बंगाली न येणारीं माणसेंही मोठ्या संख्येनें पाहतात. जागतिक विक्रमही त्यांनीं केले आहेत. आम्हांला व्ही. शान्ताराम वा राजा परांजपे यांच्याबद्दल जेवढा अभिमान वाटतो, तितकाच अभिमान बंगाली सत्यजित रे यांच्याबद्दलही वाटतो. त्यामुळेंच ह्या यादींत त्यांचें नांव पाहून समाधान वाटतें. डॉ. जयंत नारळीकर हे सध्यां भारतांत आले आहेत. ठिकठिकाणीं त्यांचीं भाषणें होत आहेत. सत्कारही होत आहेत. हा तरुण, कर्तबगार संशोधक ह्या राष्ट्रकारणीं लागावा म्हणून नामदार पंतप्रधानानीं त्यांना भारतांतच राहण्याची विनंति केली ती सर्वस्वीं उचित आहे असेंच कुणीही म्हणेल. जागतिक महत्वाचे नवें, मौलिक संशोधन करणारी व्यक्ति ह्या देशांतच राहील व तिच्या बुद्धि-कर्तृत्वाचा लाभ ह्या मायभूमीला होईल अशीच आपण आशा करूं या. जयंत नारळीकर यांचा पराक्रम एका वेगळ्या क्षेत्रांतला असेल तर **शंतनुराव किर्लोस्कर** ह्यांचा विक्रम वेगळ्या क्षेत्रांतला आहे. **किर्लोस्कर** ह्या नांवानें महाराष्ट्राच्या सामाजिक, सांस्कृतिक व औद्योगिक क्षेत्रांत फार मोलाची कामगिरी केली आहे. एका नव्या विश्वासाची देणगी त्या नांवानें महाराष्ट्राला दिली आहे. महाराष्ट्र हा साहित्य, कला, संस्कृति ह्या विषयांत जसा पुढें आहे, तसाच तो औद्योगिक आघाडीवरही पुढें राहील ह्यासाठीं ज्या व्यक्ति प्रयत्नशील राहिल्या आहेत त्यांत शंतनुराव किर्लोस्कर ह्यांचें नांव प्रामुख्यानें घ्यावें लागेल. १९२६ मध्ये अमेरिकेंतील मेसाच्युसेटस्‌मधील तंत्रविषयक ज्ञान देणाऱ्या संस्थेंतून पदवी संपादन केलेले, निळ्या डोळ्यांचे, साडेपांच फूट उंचीचे उत्तम शरीर संपदा लाभलेले. एकसष्ट वर्षांचे शंतनुराव हे किर्लोस्कर उद्योग समूहांतील सात कंपन्यांचे प्रमुख म्हणून आज काम करीत आहेत. विविध अशा बेचाळीस देशांशीं शेतकीविषयक व उद्योगविषयक विविध अवजारें पुरविण्याची महत्वपूर्ण कामगिरी आज किर्लोस्कर कंपनी पार पाडीत आहे. आज आपल्या देशांतील गरजेला लागतील त्यापैकीं ६५% डिझेल एंजिनें, ४०% सेंट्रिफ्युगल पंप व ३६% इलेक्ट्रिक मोटारी यांचा पुरवठा आज किर्लोस्कर उद्योग समूह करीत आहे. निर्मितीपैकीं २०% डिझेल एंजिनें पश्चिम जर्मनीपासून कॅलिफोर्नियापर्यंतच्या विविध विदेशांना पुरविलीं जात आहेत. प्रारंभकालीन परंपराप्रिय भारतीय





अनुक्रमणिका

"अस्सं !"

नाटकांत हा 'अस्सं' शब्द अधून मधून असावा. पुढचा संवाद आठवला नाहीं तर 'अस्सं'ची कुबडी लावून वेळ काढतां येतो.

"बरं सीताराम, तूं हें सांग– तूं आज काय योजून आला आहेस ?"

"राजाराम, तुला कसं कळलं मी कांहीं योजून आलों आहे तें ?"

"माझा आंतला आवाज सांगतोय्."

इथें सीताराम हंसतो. प्रेक्षकांनाहि हंसायला आडकाठी नाहीं.

"हें पहा राम्या, एका महत्त्वाच्या कामांत तुझी मदत हवी आहे."

"हें पहा सीताराम, सध्यां आर्थिक परिस्थिति फार हलाखीची आहे."

इथें मी सुस्कारा टाकतो. आतां टाकण्यासारखें असें तेवढेंच आहे.

"हें पहा राम्या, मला पैसे नको आहेत. उलट मीच तुला पैसे देईन."

इथें माझें तोंड उघडें पडतें. तेंहि अभिनयासाठीं. एरव्हीं सीतारामाकडून पैसे मिळतील यावर कोण विश्वास ठेवील ?

"म्हणतोस काय सीताराम ?"

"खरं तेंच सांगतोय्. तूं मदत करीन एवढं म्हण !"

"सीताराम, बेटा, आमची हयात कशी गेली हें तूं जाणतोसच !"

"कशी गेली ?"

"दुसऱ्यांना मदत करण्यांत गेली हें तुला कितींदा सांगायचें ?"

"मग दे टाळी–"

पण मी टाळी देत नाहीं. कारण टाळीसाठीं हातांतलें सूत मी सोडलें असतें तर तें निश्चितच गोंधळलें असतें.

"आतां तुझें काम काय तें सांग–"

"ऐक – लक्ष आहे ना ?"

"बेटा, सूत कातता कातताांच गांधीजींनीं सर्वांचें ऐकलें, आणि राजकारण केलें, हें तूं जाणतोस ना ?"

"तूं स्वतःला कोण महात्मा गांधी समजतोस कीं काय ?"

**धिःक्कार मन साहिना....**



"छे – छे ! तसें कसें समजेन ?"

"पण दोन तासासाठीं तूं स्वतःला गांधी समजशील तर माझें काम होईल."

"तें कसें ?"

"दोन आक्टोबरला गांवांत गांधीजींचा पुतळा उभा करायचा आहे ना ?"

"होय !"

"अनावरण करायला मोठे पुढारी येणार आहेत."

"मीहि येणार आहे !"

"पुतळ्याचें कंत्राट माझ्याकडे आहे. पंधरा हजाराचें कंत्राट. आठ फूट उंचीचा चबुतरा बांधून तयार आहे !"

"तो मी पाहिला."

"आणि पुतळा पाहिलास ?"

"नाहीं. पुतळ्याच्या सभोवार कापडी पडदे आहेत. त्यामुळें आंतला पुतळा दिसलेला नाहीं."

"नाहींच दिसणार !"

"कां ?"

"कारण आंत पुतळा नाहींच आहे."

"मग ?"

मी एकदम टकळी खाली ठेवतो. आतां सूताची लड तरी कशासाठीं?

"ऐक ! नीट कान देऊन ऐक. पुतळा तयार झालेला नाहीं. होणारहि नाहीं"

"कां ?"

"आपल्या लोकांना पुतळ्यांत पैसा अडकवून ठेवण्याची वाईट खोड जडली आहे. अरे कावळे, कबुतरें यांना बसायला जागा देण्यासाठीं पंधरा हजार रुपयांचा पुतळा ?"

"मग तूं करणार आहेस काय ?"

"तुला मेकप करून उभा करणार !"

"म्हणतोस काय ? म्हणजे जन्मभर मी त्या चबुतऱ्यावर उभा राहूं?"

माझ्या तोंडचें पाणी पळतें. मी धसक्यानें उठून उभा रहातो. (कसा आहे स्टार्ट ?)

"आतां कसा उभा राहिलास ?"

मी उभा राहिलों हें पाहून सीतारामाला आनंद होतो.

"मी गांधीजींचा पुतळा म्हणून उभा राहिलेलो नाहीं."

"पण राम्या, असाच दोन तास उभा रहाशील तर नक्त दोन हजार रुपयांची कमाई करून जाशील."

"दोन हजार रुपये ?"

"दोन तासांत दोन हजार. जन्मभर उभा राहिलास तरी मिळणार नाहींत."

"दोन हजार ?"

मघाशीं तोंडचें पाणी पळालें होतें, तेंच पुनः तोंडाला सुटलें.

"दोन हजार रुपये."

(पान ६८ पहा)






शेतकऱ्याला ह्या औद्योगिक निर्मितीचें महत्व पटवून देणें अवघड होतें. परंतु प्रयोगाचें द्वारें तें पटवून देण्याचें काम शंतनुरावांनीं केलें. उंसाचा रस गाळणारें यंत्र त्यांनीं शोधून काढल्यावर त्याची महति पटवून देण्यासाठीं रस काढलेला ऊंस परत मागविला व त्यांतून भरपूर रस काढून दाखविला. नवनवीन संशोधन व कुशल प्रचार ह्यामुळें आज शंतनुराव हें एक महाराष्ट्राचे औद्योगिक सामर्थ्य ठरलें आहे. त्यांचा गौरव हा नव्या, औद्योगिक दृष्टया प्रयत्नशील होत असलेल्या महाराष्ट्राचा जणुं गौरव आहे असे म्हटलें तर शंतनुरावांना अन्याय झाला आहे असे वाटूं नये. ☆☆



पद्मश्री वि. ना. आडारकर

# पद्मश्री कवि कलावंत आणि क्रिकेटर



पद्मश्री अनंत काणेकर

**नव्या** मानकऱ्यांत **पद्मश्री** म्हणून प्रा. अनंत काणेकर, विख्यात क्रिकेटपटु प्रा. डी. बी. देवधर व जे. जे. स्कूल ऑफ आर्टस् (मुंबई) चे डीन श्री. वि. ना. आडारकर ह्यांचा समावेश झाला आहे हें वाचूनही मराठी माणसांना बरें वाटलें. कलेच्या व क्रीडेच्या क्षेत्रांत महत्वपूर्ण कामगिरी केलेल्यांचा हा गौरव कलेच्या राजमान्यतेची मी पावतीच समजतो. लोकमान्यता ह्या तिघांनीं कधींच संपादन केली आहे. मराठी साहित्याची कुठलीही लहान सहान गोष्ट काणेकरांना बरोबर घेऊन होते असें मी म्हटले तर अतिशयोक्ति होणार नाहीं. साहित्याचे क्षेत्र हें वस्तुतः वादावादीचें, मतभेद भांडणाचे क्षेत्र ! सर्वसामान्यपणें तिथें अजातशत्रुत्व ही गोष्ट दुर्मिळ ! पण काणेकर ह्या व्यक्तीला कशी कुणास ठाऊक ही किमया साधली आहे. काणेकरांच्या व्यक्तित्वांतल्या व स्वभावांतल्या अंगभूत गोडव्यानें ही गोष्ट सिद्ध झाली आहे असें मला वाटतें. काणेकरांचे तास अतिशय रंजक असतात. काणेकरांचीं व्याख्यानें गाजतात. काणेकरांच्या लेखणीनें फार चांगल्या कविता, लघुनिबंध, कथा, नाटकें मराठीला दिलीं आहेत. ती लेखणीप्रमाणेंच सर्वसंचारी आहे. वृत्तपत्रांतहि तिनें कांहीं ठसे उमटविले आहेत. मिष्किलपणा हा त्यांच्या वाणी, लेखणीचा गुण आहे. आणि वृत्तीचें चिरतारुण्य ही त्यांना लाभलेली फार मोठी देणगी आहे ! विद्याव्यासंगानें पुष्कळशीं माणसें रुक्ष होतात. पण चिंतनशील प्रकृति लाभूनही काणेकर मात्र ताजे टवटवीत राहिले आहेत. काणेकरांच्या ह्या तारुण्याचाच जणुं हा गौरव आहे असें मी मानतो. "**रुपेरी वाळू**" ह्या पुस्तकाचे निमित्तानें त्यांनीं केलेला विनोद मराठी वाचक कधीं विसरूं शकतील असें वाटत नाहीं.

प्रा. देवधर हे कोणत्या विषयाचे प्राध्यापक होते ह्याची माहिती कदाचित् महाराष्ट्राला नसेल. पण ते 'क्रिकेट' ह्या विषयांतले तज्ञ आहेत ही गोष्ट मात्र शाळकरी पोरापासून साऱ्यांना ठाऊक आहे. वयाच्या चौदाव्या वर्षी देवधरांनीं बॅट हातांत धरली ती वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी निवृत्त होऊन खालीं ठेवली. सतत चाळीस वर्षे क्रिकेटच्या क्रीडांगणावर खेळलेले देवधर हे भारतांतलेच नव्हे तर जगांतले पहिलेच खेळाडू आहेत. १९१३ सालीं चौरंगी सामने सुरू झाले. तेव्हांपासून देवधर हिंदु संघात खेळले. नंतर १९३७ ला पंचरंगी सामने सुरू झाल्यावरहि त्यांचा हिंदु संघात समावेश झाला ऐन संकटाच्या काळीं विश्वासानें खेळून विजयश्री खेंचून आणणारा भरंवशाचा खेळाडू म्हणून देवधरांनीं कीर्ति संपादन केली. धांवांचे अनेक विक्रम त्यांनीं केले. १९२६ सालीं एम्. सी सी. विरुद्ध ऐन वेळीं 'बदली' खेळाडू म्हणून समावेश झाला असतांना त्यांनीं अवघ्या साडेचार तासांत १४८ धांवा काढल्या व त्यांना 'बदली' खेळाडू म्हणून घेतल्याची यथार्थता पटवून दिली. १९३३ सालापासून देवधर रणजी सामन्यांत खेळूं लागले. १९४०–४१ मध्यें त्यांनीं अजिंक्यपद मिळविलें. १९४० सालीं तर त्यांनीं मुंबईसंघाविरुद्ध २४६ धांवा काढून वैयक्तिक विक्रम स्थापला. देवधर एकूण चाळीस वर्षे क्रिकेट खेळले. पहिल्या प्रतीचे अधिकृत सामने २५ खेळले. त्यांत सुमारें ३००० वर धांवा केल्या. धांवपटु व संघनायक म्हणून त्यांनीं कीर्ति मिळविली. कुशल क्षेत्ररक्षक व गोलंदाज म्हणूनही त्यांनीं नांव कमावलें. ते १९१७ सालीं स. प. कॉलेजांत प्राध्यापक (संस्कृतचे) झाले. तीस वर्षे त्यांनीं

( पान ६० वर पहा )

-डॉ. बाळ गांगल



'सीमे'चा प्रश्न सीमेचा अवघड झाला होता.
कुणाला तरी एकाला आपलं
कांहीं तरी सोडावं लागणार होतं.
एका म्यानांत दोन तलवारी बसूं शकणार
नव्हत्या. संघर्ष निकरावर आला.
–आणि अकल्पितपणें सुटलाही !!
–तुमची कल्पनाही नसेल
अशा पद्धतीनें !!!

**मुंबई** रात्रीच्या वेळेला इतकी सुंदर दिसते हें मला पूर्वी विशेष जाणवलं नव्हतं. निदान आजच्या इतकं तरी. दुकानांवरच्या निऑन-साइन्स आज विशेष तजेलदार दिसत होत्या आणि एकूणच मुंबईला उजाळा आल्यासारखा वाटत होता. सीमाला घरी सोडून मी परत येत होतो. त्या कुणा इंग्लिश कवीनं म्हटल्याप्रमाणं 'God is overhead and all is well with the world—' सारखं मला वाटत होतं. सीमासारख्या गोड पोरीबरोबर ६ चा शो बघून घरीं परततांना ह्याहून वेगळं काय वाटणार ? कुणीहि अनुभव घेऊन पहावा. अर्थात सीमाला पिक्चरला नेऊन नव्हे, सीमासारख्या गोड पोरीला. सीमा म्हणा तशी कुणाबरोबर जायचीहि नाहीं. कारण माझ्याबरोबर येण्यापूर्वी तीच नव्हती कां म्हणाली ? ती काय म्हणाली होती तें आठवलं आणि गोष्टींत म्हण-तात त्याप्रमाणें मला गुदगुल्या झाल्या, संस्कृत नायकाप्रमाणें माझ सर्वांग पुलकितहि झालेलं असणार पण 'पुलकित' म्हणजे नक्कं काय हें मला माहीत नसल्यानें मी शपथेवर तसं कांहीं झाल्याच सांगूं शकत नाहीं. एवंगुणविशिष्ट आणि उपरिनिर्दिष्ट गोड शिरशिरं माझ्या सर्वांगभर दौडून जात असतांनाच, माझ्या खांद्याला ए वेगळाच स्पर्श जाणवला. गोड शिरशिरीहून त्या स्पर्शाची जा वेगळी होती. पण मी आपला मजेंत चालतच राहिलो. म्हटलं सिनेमां तल्या नायकाच्या किंवा नायिकेच्या खांद्यावर ज्याप्रमाणें पक्षी बिन दिक्कत बसतात त्याप्रमाणें मीहि एक प्रेमिक आहे असं जाणू मुंबईंतलं एखादं कबुतर बिबुतर बसलं असेल. बसेना बापडं ! आप ल्याला कांहीं तें चावत नाहीं आणि चावलंच समजा गालाला तर.. अहाहा ! चालेल. सीमा ! तिचे ते 'फेमस' कुंदकळ्यांसारखे दां नि समजा...मजा वाटली. इतक्यांत खांद्यावरचा दाब वाढल

इतका वाढला कीं मला पुढें चालतांच येईना. कबुतर नसून एक वराचसा दणकट हात आपल्या खांद्यावर आहे एवढं जाणवलं. म्हणून त्या हाताला चिकटलेला मालक कोण आहे तें पाहण्यासाठीं मी वळलो. किंवा खरं सांगायचं म्हणजे वळायचा प्रयत्न केला. मला वळतां आलंच नाहीं. म्हणजे माझ्या खांद्यावरचा हात बराचसा दणकट नसून भयंकर बळकट आहे हें मी क्षणार्धांत ताडलं. डिटेक्टिव्ह स्टोरीमध्यें चाणाक्ष गुप्तहेर गुन्हेगाराच्या खांद्यावर अशा प्रकारें हात ठेवतों हें मला आठवलं. पण माझ्या खांद्यावर असा हात? अलीकडे मी कांहीं खूनबीन केलेला नव्हता. मग.....इतक्यांत त्या हाताच्या मालकाचा आवाज आला—

"मिस्टर, तुमच्या खांद्यावर हात ठेवून मला सगळी मुंबई पहायची इच्छा नाहीं." त्यानें हात काढला.

"नाहीं? मग हात ठेवलांतच कशाला?" मी म्हणालो. आणि वळलो. माझं डोकं ज्याच्या खांद्यापर्यंत पोंचत होतं असा एक गृहस्थ—गृहस्थ कसला—मस्त बैलाच्या जन्माला जायच्याऐवजीं चुकून माणूस झालेला एक गुंडच माझ्यासमोर उभा होता. मनांत म्हटलं. ह्याचं नांव अवचट, ढमढेरे, धोंगडे वगैरे असं कांहीं असणार. अशा माणसानं खांद्यावर हात ठेवणं एरव्ही मला बिलकुल आवडलं नसतं पण आजची गोष्टच वेगळी. आज साऱ्या जगाला सात गुन्हे माफ करायची माझी तयारी होती. मी चांगलं आकर्ण हंसलो नि म्हणालो,

"आपला परिचय होण्याचं सद्‌भाग्य अजून मला...."

"'लाभलेलं नाहीं' ना? 'माझं नांव अरविंद देशपांडे!..."

मला एकाएकी भयंकर हंसूं कोसळलं. ह्याचं नांव अरविंद! कहर झाला. जन्मतः पंधरासोळा पौंडी असणार हा प्राणी. आतां कसंहि झालं तरी आईबापाचं आपल्या मुलावर प्रेम असणार वगैरे सगळं ठीक आहे. पण असल्या माणसाचं नांव चक्क अरविंद ! रुखवताच्या लाडवाला रसगुल्ला म्हटल्यासारखं! मराठी भाषेंत काय ह्याला साजेशी नांवंच नाहींत ? विठ्ठल, धोंडो, धुंडिराज, भालचंद्र! हजारो नाहीं तरी शेंकडो नक्की निघतील. विचार करतां करतां त्याचा हात जिथं ठेकला होता तो खांद्याचा भाग मी जरा चोळून बघितला. हाडं वगैरे जागच्या जागीं असावीत.

"माझं नांव सुधीर कुलकर्णी." परिचयाचा कार्यक्रम जारी ठेवीत मी म्हणालो, "बोला अरविंद साहेब, मी आपली काय सेवा करूं शकतो?"

त्यानं भुवया खोचून एकदां माझ्याकडे पाहिलं नि म्हटलं, "मिस्टर सुधीर, तुम्ही कधीं फ्रि-स्टाईल कुस्ती खेळलां आहांत?" "नाहीं बुवा" मी म्हणालो, "तुमचा कांहीं क्लासबिस आहे कीं काय? नाहीं म्हणजे तरुण पिढीनं कुस्तीबिस्ती मारली पाहिजे ह्यांत बिलकुल संशय नाहीं. पण.. मला म्हणाल तर फ्री-स्टाईल कुस्तीची फारशी आवड नाहीं. फ्री-स्टाईलच कशाला, ग्रेकोरोमन, हनुमंती, जांबुवंती, जरासंधी वगैरे कोणत्याच कुस्तीची मला तितकीशी आवड नाहीं. म्हणजे पहायला हरकत नाहीं....!!"

"मिस्टर कुलकर्णी, तुम्हीं बोलतां फार!" तो घटिंगण.

"एक्झॅक्टली! बरोबर ओळखलात तुम्ही माझा स्वभाव. आपल्याला लहानपणापासून बोलायची फार आवड. माझी आई नेहमीं म्हणायची कीं स...्या म्रहिन्या....."

"तुमची आई काय म्हणायची त्याची माहिती तूर्त मला नको आहे. पाहिजे असेल तेव्हां मी लेखी मागवीन."

"राहिलं ! सांगायचा मुद्दा—मला बोलायची आवड मोठी जबर. चला आपण चहा घेऊं या. नि मग निवांतपणें तुम्ही तुमचं काम काय आहे तें सांगा. चला हो ?" म्हणत मी त्याला दंडाला धरून ओढूं लागलो. मोठ्या प्रेमानं बरं कां, पण त्या अरविंदनामधारी धोंडोपंताचा माझ्याबरोबर चहाला येण्याचा विचार दिसेना. त्यानें आपल्या दंडाला एकच हिसडा दिला त्याबरोबर माझे पाय जमिनीवरून उचलले गेले आणि पूर्वीच्या जागेपासून आठ फुटांवर पुन्हां टेकले. बरं तर बरं देशपांड्याच्या दंडाला धरलेला हात मी सोडला नव्हता. नाहींतर ?..जाऊं दे. पण पहिल्याच परिचयांत त्यानं मला असं उचलून लहान पोरासारखं 'गिर गिर माना,' करावं हें आवडलं नाहीं. पण म्हटलं 'जाऊं दे.'

"तुमचा चहा वगैरे मला मुळींच नको. तर आपण कशाविषयी बोलत होतो ?" त्यानें विचारलें.

"आपल्या चर्चेचे मुख्य विषय फ्री-स्टाईल कुस्ती, चहा, माझ्या बाळपणींच्या आठवणी हे होते..."

"हं तर फ्री-स्टाईल रेसलिंगची तुम्हांला फारशी माहिती नाहीं ! हें ठरलं ?"

"चक्क !" मी उत्तरलो.

"ठीक आहे मग 'गिलोटिन् चॉप' हा प्रकार तुम्हांला माहीत नसेलच ."

"नाहीं बुवा. काय भानगड आहे ? मटन चॉपप्रमाणें एखादी नॉन-व्हेज् डिश् आहे कीं काय ?" मी विचारले.

"नाहीं हो. उजव्या हाताच्या करंगळीच्या मुळापासून तो मनगटापर्यंत जो भाग असतो त्याचाच फक्त उपयोग करून प्रतिस्पर्ध्याच्या मर्मस्थानीं विशेषतः त्याच्या मानेवर असा झटकन् फटका मारायचा कीं तो दहा अंक होईपर्यंत उठतांच कामा नये. ॲमॅच्युअर रेसलिंगमध्यें मी ह्या एका फटक्यानें अनेकजणांना नॉकआऊट् करून

नाहीं मी बोलत नाथा (हिंदी....!)





## "दोन इंटरव्हल्स"

नांदेडच्या नाटच संमेलनाचे वेळीं प्रकट भाषणांतून आणि खाजगी गप्पागोष्टींतून पु. ल. देशपांडे यांनीं अनेक किस्से सुनवले. नाटकाकडे पाहण्याचे दृष्टिकोन किती निरनिराळे असूं शकतात हें सांगतांना ते म्हणाले, "मुंबईच्या एका नाटचगृहांत माझे बहुरुपी प्रयोग नेहमीं होत असतात. या प्रयोगांना गर्दी होत असल्यामुळें तेथील कॅन्टिनवाला त्यावर फार खुष असतो. तो मला परवां म्हणाला, 'देशपांडेसाहेब, तुमच्या पुढच्या कार्यक्रमांत एका ऐवजीं दोन इंटरव्हल्स ठेवा.' दोन इंटरव्हल्समुळें आपल्या कॅन्टिनचें उत्पन्न वाढेल, या खात्रीनें त्यानें मला ही सूचना फार गंभीरपणें केली."

## चाळीस रुपयांचा शालू

छोटचा माणसांचे संकल्पहि छोटेंच कसे असतात, याचें निरुपण करतांना पु. ल. म्हणाले, "एक कीर्तनकार द्रौपदी वस्त्रहरणाचें आख्यान सांगतांना म्हणाला, 'दुःशासनानें द्रौपदीचें वस्त्र ओढलें कीं कृष्ण नवें वस्त्र तिला पुरवीत होता. ती राणी असल्यानें तिला शोभतील असे शालूच तो देत होता. अहो, एकेक शालू थोडचा थोडक्या नव्हे, चाळीस चाळीस रुपयांचा होता !' त्या कीर्तनकाराला चाळीस रुपये ही फार मोठी रक्कम वाटत होती."

## केळेवाडींत कोयना

नको त्या वेळीं नको ती सूचना करून माणसें दुसऱ्यांना भलत्याच अडचणींत कशी टाकतात, याचें उदाहरण देतांना पु. ल. देशपांडे म्हणाले, "मी कोयना धरण पाहायला गेलो होतो. मी थोडासा लेखक वगैरे असल्यामुळें मी आलोंय हें कळतांच गर्दी जमली. त्या वेळीं तेथील इंजीनियर साहेबांनीं माझा परिचय करून देतांना सांगितलें कीं हे आतां 'बटाटचाची चाळ' करून दाखवतील !'

ही सूचना ऐकून मी सर्दच झालों. ते म्हणाले 'त्यांत काय कठीण आहे ? तो कार्यक्रम तर एकपात्री असतो.' मी म्हटलें, 'कार्यक्रम एकपात्री असला तरी त्याला कांहीं तयारी वगैरेची गरज असते. आंतल्या बाजूला दहा माणसें मदतीला लागतात.' मग मी पुढें म्हणालों 'या इंजीनियर साहेबांची अन् माझी समजा मुंबईला केळेवाडीच्या गल्लींत गांठ पडली अन् मी त्यांना जर म्हणालों, बरं झालं तुम्ही अनायासें भेटलाच आहांत — आतां इथं जरा कोयना करून दाखवा — तर तें काय योग्य ठरेल ?"

— वा. य. गाडगीळ

टाकलेलं आहे. रेड् स्कॉर्पियन् जवळून मी गिलोटिन् चॉप्चे स्पेशल लेसन्स-घेतले आहेत. तुमच्यासारख्या माणसानं जर माझा एक गिलोटिन् चॉप् खाल्ला तर तो पाणी कांहीं मागायचा नाहीं" तो म्हणाला.

"मी तर मुळींच नाहीं मागायचो. खातांना पाणी कध्धीं पिऊं नये अशी मुळी माझ्या आजोबांची सांगीच असायची" त्याला हंसवण्याचा प्रयत्न म्हणून मी एक जोक् मारला. पण त्यानें न हंसण्याचा निश्चयच केलेला दिसला.

"शिवाय ज्युडोचा कोर्स मी तीन वर्षे घेतलाय्."

"अरे वापरे ! तीन वर्षं ! म्हणजे आपण चांगलेच एक्स्पर्ट झालेले असाल कीं. पण ज्युडो म्हंजे काय ?" मी विचारले.

"ज्युडो म्हंजे जपानी कुस्ती ! प्राणघातक प्रकार ?" तो.

"एकूण काय, जगांतल्या सगळ्या कुस्ती प्रकारांचं संमेलनच तुमच्या शरीरांत भरलंय् म्हणाना !" मी.

"आणि तुम्ही अयान फ्लेमिंगची गोल्डफिंगर कादंबरी वाचलींय् का ?"

"नाहीं बुवा."

"तिच्यांतल्या ऑड्.जॉब नांवाच्या अतिमानुष शक्तीच्या प्राण्याला तुमच्या शरीरांतल्या सात अशा जागा माहीत होत्या कीं जिथें सहज प्रहार करून विनासायास तुमचा जीव घेता आला असता."

"माझा कां बुवा?"

"ऐका. आणि ज्यादा गडबड करूं नका.ऑड् जॉबला सातच जागा माहीत होत्या पण मला आठ माहीत आहेत कारण मी योगशास्त्रही थोडंबहुत वाचलंय्. प्रयोग करून दाखवूं. आतां हें बघा." म्हणून त्यानें एक बोट माझ्या पोटांत खुपसलें, "ह्या भागाला सोलर प्लेक्सस म्हणतात. इथं जर मी आतां गिलोटिन् चॉप मारला तर किमान अर्धा तास तुम्हीं ह्या इथें रस्त्यांत विव्हळत पडाल." मी आजुबाजूला पाहिलं. अर्धा तास विव्हळत पडायला फारशी योग्य जागा नव्हती ती. जवळच कचऱ्याची पेटी होती नि साऱ्या दिवसांची गिरगांवकरांची घाण तिथें सांचली होती.

"पण कां हो अरविंदराव देशपांडे, तुम्ही ही सगळी माहिती मला सांगितलींत, शिवाय ह्या असल्या रस्त्यावर मला अर्धा तास विव्हळत ठेवण्याचं आश्वासनहि दिलंत, ह्या सगळ्याचं कारण काय?"

"सांगेन सांगेन. पण त्यापूर्वी आणखी एक गोष्ट ? मी सनूराइझ् मिलचा सेक्युरिटी ऑफिसर असल्यानें माझ्याजवळ पिस्तुलाचं लायसन्सहि आहे."

"अरे वा! पिस्तुल उडवायचं म्हंजे एकदम कडक हं."

"पिस्तुल उडवायचं! ! हं ! ! !" 'हं' चा उच्चार भल्या मोठ्या श्वासासहित त्यानें नाकांतून केला. झुंज घेणारा बैल करतो तसला आवाज आला. माझा 'पिस्तुल उडवायचं' हा शब्दप्रयोग त्याला मोठासा आवडलेला नसावा.

"हें सगळं सांगायचं कारण, उद्यांपासून तुम्हीं सीमाची भेट घेणं बंद करायचं, एकदम बंद! चिट्टीचपाटी, सिनेमाला जाणं सगळं बंद! समजलं. रस्त्यावर भेटल्यानंतरसुद्धां तुम्ही तिला ओळख न दाखवणं बरं. तुमच्याच प्रकृतिस्वास्थ्यासाठीं.............."

"अहो पण, तिचं माझं लग्न.........." हा माणूस सीमाचा विषय काढील हें माझ्या ध्यानीमनींसुद्धां नव्हतं. आणि तो अशा प्रकारें! मला कांहीं फारसं बोलायलाच सुचेना. नाहीं म्हंजे ह्या गृहस्थांनीं आमच्या गांठीभेटींना ऑब्जेक्शन कां घ्यावं हो?

"तिचं तुमचं लग्न होणार नाहीं. तिच्यावर माझं प्रेम आहे. शिवाय ती माझ्या मामाची मुलगी असल्यानें आमच्या आईवडिलांनीं लहानपणापासूनच आमचं लग्न ठरवून ठेवलंय. काय समजलं? आणि मी तुमच्याजवळ बोललोय् हे तिला कळतां कामा नये. नाहींतर ........."

मी नंदीबैलासारखी मान हलवली. सीमा कांहीं तसं कधीं म्हणाली नव्हती. पण आतां हा म्हंजे भलताच बांधा आला. सीमाशिवाय ह्या जगांत जगायचं कसं, आणि गिरगांवांत रहायचं तर सीमाची भेट तरी टाळायची कशी? आणि न टाळली तर काय ते गिलोटिन् चॉप्, सोलर फ्लेक्सस आणि शेवटी पिस्तुल! बापरे! म्युनिसिपालिटीचे दिवे तेवत असून माझ्या डोळ्यांसमोर अंधार पसरला. कसाबसा खोलीवर आलो. भयंकर स्ट्रॉंग कॉफी करून प्यायलो आणि चारमिनारची दोन पाकिटं बसल्या बैठकीला खलास केली. पण उपाय कांहीं सुचेना. शेवटी पहांटे पहांटे डुलका लागला असावा.

सकाळीं उठलो तो डोळे चुरचुरत होते. डोकं भणभणलं होतं. सीमाशिवाय सगळं आयुष्य! एकदम रिकामं रिकामं वाटूं लागलं. भकास, शून्य! गिरगांवांतली सकाळ इतकी कंडम असूं शकते हें मला माहीत नव्हतं. आतां प्रेमासाठीं माणसानं लढायला हवं वगैरे सगळं खरं, पण सारी हयात ज्यानं मारामारीच्या शिक्षणांत आणि लोकांना एका फटक्यांत नॉकआऊट करण्यांत घालवलीय् अशा अडीचशे पौंडी राक्षसाबरोबर एकशेपस्तीस पौंड वजनाचा मी लिलिपुटियन काय लढणार? शिवाय त्याला माझ्या शरीरांतली आठ मर्मस्थळं ठाऊक. देवा देवा देवा! काय करावं कांहीं सुचेना. नाहींतर ऑफिसांत जाऊन माझ्या हातून कांहीं काम झालं नसतंच तेव्हां सिक्लीव्हसाठीं कार्ड खरडून टाकून आलो आणि पुन्हां डोकं धरून बसलो. मी डोकं धरून बसलो आणि माझा खंड्या कुत्रा कान पाडून माझ्यासमोर येऊन उभा राहिला. दोन तीन वेळां जीभ बाहेर काढून, मान हलवून आणि शेंपूट घोळवून त्यानं मला "धनी काय काळजी आहे मला तरी सांगा. बघू या कांहीं मार्ग निघतोय् कां?" असं विचारलं.

माझा खंड्या धनगरी कुत्रा आहे. गांवाहून आणलाय्. शिकारी आणि अत्यंत इमानी. माझे मूड्स् त्याला इतके कळतात! माझं बोलणंहि त्याला समजतं. मी छू: केल्यानंतर कोणाच्या नुसतंच मागें लागायचं, कोणाची पँट फाडायची आणि कोणाच्या पोटरीचा घास घ्यायचा हें त्याला माझ्या नुसत्या स्वरावरून उमजतं. सगळं खरं! पण ह्या बाबतींत तो काय करणार? प्रेम-बिम त्याला कांहीं कळायचं नाहीं. तो म्हणेल,"आमच्या जातीचा कायदा म्हणजे-'ज्याला शक्ति, त्याला प्रीति,'' तरी पण मी आपली केस त्याला समजावून सांगितली. त्यानेंहि ती शांत चित्तानें ऐकून घेतली. खांदे उडवून 'असं आहे तर' म्हटलं नि तो कोंपऱ्यांत जाऊन विचार करीत बसला. साहेबांचा मूड बदलल्याशिवाय 'नळी' मिळायची नाहीं हा विचार कदाचित् त्याच्या मनांत प्रबल असेल.

दोन दिवस घरांत बसून राहिलो. 'हूं नाहीं कीं चूं नाहीं.' खालच्या इराण्याकडून पाव आणून खाल्ले आम्ही दोघांनीं! बाहेर पडायची सोय नव्हती. गिरगांवांत सीमा कुठेंहि भेटायची शक्यता होती. आणि पँटच्या खिशांत हात नि हातांत सहावारी भरलेलं पिस्तुल घेऊन तो नॉक-आउट स्पेशॅलिस्ट तिच्या मागावर असला म्हंजे पंचाईत. एकदम इतिश्री! खरं म्हंजे सीमाला दुसऱ्याच दिवशीं भेटायचं कबूल केलं होतं. न जाणं किती वाईट दिसलं असतं. पण करतां काय? म्हटलं, गेलो नाहीं कीं प्रथम रुसेल, मग रागवेल, मग म्हणेल हा एवढा आखडतोय, तर माझं अडलंय् खेट्टर नि मग हळूंहळू ती मला विसरून जाईल. मग बरं! हा जन्म तरी निदान अंगांतील एकशें सात कीं दोनशें सात हाडं जागच्या जागीं ठेवून काढतां येईल. सीमाची भेट पुढील जन्मीं! अरविंद देशपांडे पुढल्या जन्मीं नक्की साठमारीचा बैल होईल आणि अर्थातच सीमेच्या प्रेमांत प्रतिस्पर्धी बनणार नाहीं, ही काळचा दगडावरची रेघ! मी हिंदु असल्याचा त्या दिवशीं अभिमान वाटला. पुनर्जन्म वगैरे भानगड नसती तर काय खलास. सीमा नाहीं म्हणजे अनंत काळपर्यंत नाहीं! मी ख्रिश्चन वगैरे नाहीं म्हणून फार बरं वाटलं.

अशा प्रकारें मनोविनोदनासाठीं वाटेल ते विचार करीत दोन दिवस काढले. तिसऱ्या दिवशीं सकाळीं पाव घेऊन वर आलो, चहा करण्यासाठीं स्टोव्ह पेटवला, इतक्यांत् दाराशीं सीमा! कप् काढीत होतो तो हातांतून निसटला.

'सीमा तूं?" म्हणून प्रथम तिच्या अंगावरून प्रथम गॅलरींत धांवलो. इकडे तिकडे पाहिलं. नजरेच्या टप्प्यांत तरी तो कुठं दिसला नाहीं.

"सीमा तूं... ?" मी पुन्हां विचारलं.

"हो, कां?" सीमा माझ्या चेहऱ्याकडे टक लावून पहात म्हणाली, "मीच, सीमा! सीमाचं भूत नव्हे. तूं इतका घाबरलायस् कां ?"

"नाहीं, पण तूं इथं कशाला आलीस?"

"कशाला आलीस?" सीमानं विचारलं, "छान प्रश्न आहे. परवांच यायचा होतास तूं तो आला नाहींस. कांहीं चिठी नाहीं. ॲपॉइंटमेंट चुकवल्याबद्दल ॲपॉलॉजी नाहीं नि मी आपल्या पायानं चालून आले तर मला 'बस' म्हणून सुद्धां न म्हणतां 'तूं इथं कशाला आलीस'

( पान ६० वर पहा )

कशिया त्यजूं पदां या....



# एक भला माणूस

— श्रीराम कामत

**वस्तु संग्राह्य असली आणि दुर्मिळ झाली कीं ती संग्रहालयांत ठेवावी लागते. आजच्या जमान्यांत 'भलेपण'हे 'संग्राह्य' झालें आहे. मुक्या वेदकची ही कथा हेंच नाहीं का सांगत ?**




**कांहीं** दिवसांपूर्वी 'जनमनाच्या कानोशां'त माझं एक पत्र प्रसिद्ध झालं.

ह्यांत मी लिहिलं होतं—

भला माणूस आजकाल दुनियेंतून उठला आहे. तो बिल्कुल दुर्मिळ होत चालला आहे. राणी छाप रुपयासारखा. चलनांत ह्याला भाव नाहीं त्रेटा केंव्हांच वाद झाला आहे.

खरं म्हणजे, सरकारनं इकडे थोडं लक्ष घालायला हरकत नाहीं. नाहींतरी दुर्मिळ होत चाललेल्या प्राण्यांच्या संरक्षणाची जबाबदारी सरकारवरच आहे. आनंदाची गोष्ट कीं सरकार आपली जबाबदारी जाणतं, मानतं. उदाहरणार्थ, तिकडे गिरिनार पर्वतावर सिंहासाठीं खास सुरक्षित जंगलं राखून ठेवण्यांत आलीं आहेत. भल्या माणसासाठीं सुद्धां अशी एखादी संरक्षण योजना तांतडीनं अंमलांत यायला हवी. सर्वसाधारण मनुष्यवस्तीपासून दूर, एकीकडे, कुठंतरी सह्याद्रीच्या दरीखोऱ्यांत जियं फक्त भलीं माणसं भलेपणानं वावरूं शकतील अशी एखादी जागा..

हें मात्र खरं ! कितीहि घाई केली त योजना म्हटली कीं वेळ खाणारच ! दरम्या ह्या भल्या माणसांचं काय होईल, नांव घ्याय तरी तो शिल्लक राहील किंवा नाहीं हा ए प्रश्न आहे. म्हणूनच माझी अशी सूचना अ कीं – योजना प्रत्यक्षांत जेव्हां केव्हां अंमल येणार असेल तेव्हां येवो, तोंपर्यंत तरी चारदे भलीं माणसं पकडून राणीच्या बागेंत पिंजऱ्य ठेवण्यात यावींत. म्हणजे लोकांना हीं प्रत्यक्ष बघतां येतील ! आणि कदाचित् मग पटे सुद्धां कीं आपल्या देशांतहि भलीं माण नाहीत असं नाही ! होय, ह्यांना पिंजऱ्या कोंडून ठेवणंच बरं ! पिंजऱ्यालाहि भक्क जाळी बसवावी लागेल ! उत्साहाच्या भर माणसं नेमकीं कशीं वागतील आणि निश्चि काय करतील सांगणं कठीण ! मात्र पिंजऱ्य वर पाटी लावावी. ही अशी—एक भला माणू ए गुड मॅन, अच्छा आदमी ! नांव नसलं त चालेल. नाहींतरी भल्या माणसाच्या नांवा लोकाना कर्तव्य नाहीं. त्याच्याशीं तीं थोडा संबंध ठेवणार आहेत....

'ज. म. कां.' त पत्र प्रसिद्ध झालं आणि बरोबर चार दिवसांनी मला सरकारचं प आलं. "भल्या माणसा —"

तो मायना वाचूनच मी गार पडल पुढं वाचलंच नाहीं. उलट टपालीं सरकार कळवलं कीं मी भला माणूस नाहीं. माझा ए दोस्त आहे.

आश्चर्याची गोष्ट सरकारनं आपली चूक एकदम मान्य केली. ती इन्ॲडव्हर्टन्टली (म्हणजे अनवधानानं, म्हणजेच निष्काळजीपणामुळं) झाली असल्याचा रीतसर खुलासा केला. मला झालेल्या मानसिक त्रासाबद्दल दिलगिरी व्यक्त केली. आणि मग आधींच्या पत्राचा क्रमांक, दिनांक वगैरे नमूद करून विचारणा केली—"पहिल्या पत्रांत विचारलेली माहिती कधीं कळवतां ? वाट पहात आहोंत."

खुष होत्साता सरकारचं पहिलं पत्र मग मी हातांत घेतलं. संबोधनार्थी भल्या माणसावर लाल शाईनं काट मारून पत्र वाचूं लागलो... माझ्या दोन्ही सूचना सरकारला स्वागतार्ह वाटल्या होत्या. माझ्या सक्रीय सहकार्याची अपेक्षा करून पत्रांत सरकारनं मला विनंति केली होती..."आपली दुसरी सूचना तात्काळ कार्यवाहींत आणण्यासाठीं सरकार कोशीस करीत आहे. आपल्या परिचयांत असा कोणी भला माणूस असल्यास त्याची माहिती विनाविलंब आम्हांस देण्याची मेहरबानी व्हावी. सरकार ऋणी राहील..." वगैरे वगैरे

हें सगळं वाचलं आणि आनंदानं मी ओरडलोंच, "मुक्या, यू लकी डॉग—"

मुक्या म्हणजे मुकुंद वेदक (कुत्रा नव्हे. गैरसमज होऊं नये म्हणून मुद्दाम हा खुलासा) माझा तो दोस्त आहे. निदान मी तसं मानतो. त्याचं मत मला माहीत नाही. दोस्त असूनहि मुक्याबद्दल मला नितान्त आदर आहे. त्याला शक्य ती मदत करण्याचा मी नेहमीच प्रयत्न करतो. आणि गरज असूनहि मुक्या ती कधीं स्वीकारीत नाहीं. त्याचं भलं व्हावं अशी माझी प्रामाणिक इच्छा असते. आणि ती संधि आली होती. त्याच्यावर मी जन्माचे उपकार करून ठेवणार होतो — आणि विशेष म्हणजे त्याला ही गोष्ट जन्मांत कळणार नव्हती. आणि सरकारला सहकार्य केल्याबद्दल मला कदाचित् पद्मश्री मिळाली तर तो फायदा वेगळाच —!

तुमचा तर्क बरोबर आहे. मुकुंद वेदक भला माणूस आहे. ह्या भलेपणापायीं त्याच्या आयुष्याचं वाटोळं झालं आहे. त्याला ओळखणाऱ्या सगळ्यांनाच असं वाटतं. वाटत नाही फक्त मुक्याला. आपलं काही कम्प्लीट नाही, परफेक्ट नाही (वाटोळं नव्हे ! भलेपण) असा त्याचा दावा आहे. आग्रहाचा, आर्जवाचा,

हा आग्रह, हा आर्जव — हेंच मुकुंद वेदकच्या व्यक्तिमत्वाचं वैशिष्ट्य आहे. सहसा वरोवरीनं न जाणारे हे दोन गुण — ह्याच शिदोरीवर दुसरा एखादा मंत्र्याच्या खुर्चीपर्यंत पोंचला असता ! मग कितीका मंगड असेना ! पण हा भला माणूस मात्र बेकार झाला आहे, बेघर झाला आहे. भणंग, निराश्रित झाला आहे. नशीब ! मुक्याचं नाही म्हणतां येत — त्याला पर्वा नाही कशाचीच !

मुक्याला थोडींच माणसें ओळखतात.ओळख देणारीं तर फारच थोडीं. मी अशापैकीं एक—सेवादलांत आम्हीं एकत्र आलों. तेव्हांहि त्याचा स्वभाव असाच होता. भीडस्थ, आपल्यापेक्षां दुसऱ्याचाच अधिक विचार. विचारलं तर बोलणार. नाहीतर आपला निमुटपणें कार्य करीत राहील. त्याची खरी ओळख मला पटली अशीच एक दिवस. झाडं लावण्याची मोहीम त्या दिवसांत विशेष बोकाळली होती. सेवादलाच्या वतीनं आमच्या शाखेच्या जागेंत वृक्षारोपणाचा कार्यक्रम होता. कोणीतरी आमदार (किंवा नगरपिताहि असेल) आपल्या पवित्र (असायलाच हवा. नाहीतर ह्याला आम्ही बोलावलंच नसतं.) हातांत फावडं घेऊन जमीन खणीत होता.

इतक्यांत मुक्या वेदक एकदम पुढं झाला. म्हणाला, "फावडं बरं नाहीं दिसत."

धांवत जाऊन त्यानं दुसरं फावडं आणलं. पण ह्याचा दांडा बरोबर नव्हता. एकानं दांडा शोधून आणून दिला. पण मुक्याच्या मतें तो मोठा होता. तेव्हां करवतीनं कापून तो मापाचा करण्याखेरीज गत्यंतर नव्हतं. कुणीशी करवत आणून दिली. पण तिला धार नव्हती. आतां मात्र मुक्यानं कपाळावर हात मारला आणि कानस हवी म्हणून मोठ्यानं मागणी केली. काही वेळानं कानस आली तसा करवतीला धार लावीत तो बसला. एव्हांना सेवादलांतील कांहीं पोरांनीं झाडाची एक तोडलेली फांदी बाजूला आणून टाकली. तिकडे लक्ष गेलं तसा मुक्या वैतागानें पुटपुटला, "तोंडानं म्हणतील झाडं लावा, झाडं लावा — आणि हातानं झाडं तोडून फांद्या ह्या अशा रस्त्यावर टाकतील ! काय अर्धवट लोक आहेत."

यावर आमच्यापैकीं एकानं खुलासा केला, "मग पुरायचं कोणाला—तुला ?"

झालं ! मुकुंद वेदकाच्या उत्साहावर विरजण पडलं. हातांतली कानस त्यानं दिली फेंकून. करवत खालीं आपटली. हातवारे करीत आमदाराच्या समोर जाऊन तो उभा राहिला. आतां बोलणार तर आमदारानंच हंसून विचारलं, "क्या है भाई ?"

"आपलं चुकतंय् साहेब." मुक्या बोलला, स्वर चिरडलेला, चेहरा भरडलेला, "ही फांदी लावतांय् तुम्ही पण ती जगणार नाहीं—जगणार नाहीं. माणसाचा नुसता हात तोडला आणि ह्या हाताला अन्नपाणी दिलं म्हणून तो वाढणार आहे आणि दुसरा माणूस उभा होणार आहे ? तसंच आहे हें !"

"मग च्यायला मरेना कां ?" आमदार मोठ्यानं म्हणाला, "तूं रे कां इतका सिरीयस ?"

**प्रभुपदांस नमित दास....**



"पण –"

"बेटा, मला उशीर होतोय्–"

"मी म्हणतो रोपटं लावलं तर–" मुक्यानं अडखळत प्रश्न केला. आणि आपणच मत दिलं, "कसं कम्प्लीट अन् परफेक्ट होईल.'

तसा सगळ्यांनी गिल्ला केला, "आणि हें आणायचं कुठून ?"

"जंगलांतून – विक्रोळीच्या." त्यानं आर्जवी आवाजांत उत्तर दिलं. "मीच येतो घेऊन. तासाभरांत."

आणि असं सांगून मुकुंद वेदक बांदलीनं जो गेला तो परत आलाच नाहीं. अर्थात त्याची वाट बघत मागं कोणी बसलहि नव्हतं म्हणा !

☆ ☆ ☆

**त्यानंतर** दोनतीन वर्षांनीं आगगाडींत तो मला अचानक भेटला. कॉलेज सुटलं होतं. मी घरीं चाललो होतो. दुपारची वेळ. गाडीला तशी गर्दी नव्हती. बाजूलाच काळ्या डगल्यांतील दोन पाद्री वरीच वटवट लावून राहिले होते. एकजण बायबलमधला उतारा इंग्रजींत वाचून दाखवीत होता. आणि दुसरा ह्याचंच मराठी भाषांतर करून सांगत होता. आणि हें करतांना इतर धर्मांची, त्यांतूनहि हिंदू धर्माची नसती टवाळी करीत होता.

डब्यांतील माणसें ऐकत होती. थंडपणं, अर्धवट पेंगत, जांभया देत. ह्या मुंबईकरांची सहनशीलता बाकी ठणठणीत.

ह्याचा परिणाम त्या पाद्र्यांवर नको तो झाला. त्यांचं अवसान वाढलं. आवाज चढला. ते आव्हानाची भाषा बोलूं लागले. ओरडूं लागले, "आमी शांगतों – सगळ्यांना आणि प्रत्येकाला. येशूचा धर्म तुमच्या जंगली धर्मपेक्षां मोठा हाय ! तशें जो नाय म्हणेल अशें बोलणारा हाय कोणी – ह्या डब्यामंदे ? अशला तर त्या शैतानानं पुढं – आमच्यासमोर यावें. पब्लिकपणें शामना खेळावा...."

माणसं तरीही स्वस्थच. गोगलगाय होऊन कवचांत शिरलीं. खालीं माना. आवाज बंद. जसे ते डब्यांत नव्हतेच.

पाद्र्यांची वाष्कळ अरेरावी वाढतच होती, "नामर्द, जंगली, अरे धर्मच नाय तुमांला–"

पलिकडे कोपऱ्यांत कोणीतरी ओरडलं, "महाशय, आव्हान स्वीकारलं मी. तुमच्या धर्मापेक्षां माझा हिंदुधर्म मोठा आहे."

आणि मध्यं उभ्या असलेल्या लोकांना बाजूला करीत तो पुढं झाला. दुसरा कोण ? मुक्या वेदकच. वारकेला, पोशाख गबाळा, केंस वाढलेले. पण तोच तो. त्याच्या खोल डोळ्यांत विलक्षण तेज होतं.

"मुक्या–" मी ओरडलों. पण माझी हांक त्यानं ऐकलीच नाही.

"यंग मॅन,धीस इज सीरीयस. यू अंडरस्टॅन्ड" – इंग्रजी बोलणारा पाद्री बोलला.

"कम्प्लीटली अ‍ॅन्ड परफेक्टली !" मुक्यानं आश्वासन दिलं.

"शाला तूं शैतान ! मातीचा देव तुझा. त्याचं हत्तीचं तोंड–" दुसऱ्याची शिदोरी सुटूं लागली. सगळी उसनीच होती. पोपटपंची. पटवलं होतं तें आणि तितकंच ओकून हा मोकळा झाला. त्याच्याच शब्दांत मुक्यानं त्याला उभा आडवा लोळवला.

त्याच्या साथीदाराला आतां मध्यं तोंड घालावंच लागलं. शिरा ताणून हा घोगऱ्या आवाजांत इंग्रजींत म्हणाला, "अ...अ... आय से स्पिक इन् इंग्लिश, वि लॅन्ग्वेज ऑफ अवर सेक्रेड बायबल... अ...अ... लॅन्ग्वेज इन उईच अवर ग्रेट सेव्हर ख्राईस्ट स्पोक टु गॉड अ‍ॅन्ड टु अस....."

मुकुंदानं त्याला शांत, आर्जवी स्वरांत इंग्रजींतच जाब केला, "जरूर. पण आपला गैरसमज आहे. ख्राईस्टला इंग्रजी येत नव्हतं. आणि तुमचं बायबल मुळांत आहे हिब्रूंत."

तसा डब्यांत एकच हंशा पिकला. पाद्र्याचा आवाज असा परस्पर बंद झालेला बघून सगळेच खूष झाले.

पण खरी मजा आली पुढंच. मारे ऐटींत इंग्रजी बोलत होता, पण पाद्र्याचं इंग्रजी होतं बेताचं. मुक्यापुढं त्याचा निभाव लागेना. बोलतां बोलतां तो थंडा गुंडू मल्याळींत शिरला. तसा त्याचा साथीदारहि आपली खास मराठी विसरला. आणि दोघेहि कुत्र्यांसारखे एकट्या मुक्यावर तुटून पडले. विशेष म्हणजे जी भाषा त्याला समजण्याचा बिल्कुल संभव नव्हता अशा अडम् तडम् भाषेंत.

आतां मात्र माणसं चवताळली. ओरडली "अरे इंग्रजींत बोला – इंग्रजींत बोला. नाहींतर पराभव कबूल करा—"

मुक्यानं आधीं डब्यांतील लोकांना शांत केलं, "बोलूं देत, बोलूं देत त्यांना. मला कळतंय् मल्याळी. येतंय्सुद्धां."

आणि त्यांच्याच भाषेंत तो फाड्फाड बोलूं लागला. मग काय ? काहीं विचारूं नका! टाळ्या, शिट्या, तूर्या – डब्यांत एकच कालवा माजला.

मी तर मुक्याला मिठीच मारली. विचारलं, "कमाल केलीस लेका ! पण ही भाषा शिकलास कुठं ?"

"मल्याळी ? शिकलो अशीच. खरं म्हणजे कितीतरी भाषा अजून शिकायच्यात. उडीया, तेलगू, आसामी, राजस्थानी..." त्यानं यादी लावली. अशा स्वरांत तो सांगत होता कीं त्याचंच काहींतरी चुकलं होतं.

"कुठल्या कॉलेजला आहेस ?" मी चौकशी केली.

"कुठच्याचं नाही. होतों रुइयाला. पण तें सोडलं."

"कां ?"

"उपयोग नाहीं कांहीं. मला शिकायचंय् खूप. मिळवतां येईल तें सगळं ज्ञान मला हवंय्. कॉलेजांत ते मिळणार नाहीं. आर्टस् घेतलं तर सायन्सला जातां येत नाहीं. संस्कृत घेतलं तर पाली, अर्धमागधी शिकतां येत नाहीं. मला कम्प्लीट, परफेक्ट व्हायचंय् ! नाहीं, कॉलेज माझ्यासाठीं नाहीं...."

( पान ६४ वर पहा )



















अनुक्रमणिका

–रमेश मंत्री

# स्त्री साम्राज्य – एक झलक !



**इथें बायकाच बायका !**
**'एक पत्नी व्रता'ची**
**सक्ति इथें नाहीं, इथें**
**विनयभंगाबद्दल तुम्हीं**
**पुरुषच बोंब माराल.**
**माझी मुलगी, माझी**
**( कितवी ) बायको असे**
**"गोड" संभ्रम इथें**
**पडतील.**
**–पण इथें 'प्रवेशबंदी' नाहीं !!**

**काळ** मोठा कठीण आला आहे–आम्हां पुरुषांना. जगांतली स्त्रियांची संख्या बेसुमार वाढली. इतकी वाढली, कीं, पुरुषांच्या जवळजवळ वीस पटीनं स्त्रिया झाल्या आहेत. हॉटेलांत, कचेऱ्यांत, आगगाडींत, बसमध्यें, वर्तमानपत्रांत, कोर्टांत, जिथं पहावं तिथं स्त्रियांचा सुळसुळाट झाला आहे. गिरगांव ते धोबीतलाव अशी तुम्ही सहज चक्कर टाकलीत, तर रस्त्यावरुन जाणाऱ्यांपैकीं नव्वद पंच्याण्णव टक्के स्त्रिया आणि फार तर पांच दहा टक्के पुरुष दिसतील. बिचारे पुरुष अंग चोरून, लाजत लाजत, जमिनीकडे पाहात चालतात. आणि बायका मात्र वर मान करून हंसत खिदळत, पुरुषांची चेष्टा करीत–फार काय, त्यांना चक्क धक्के मारीत जाताना दिसतात. अशा परिस्थितींत अखेर जें व्हायचें तेंच–खरें म्हणजे नको तेंच–झालें आहे. तें असें, कीं जवळ जवळ प्रत्येक पुरुषाला निदान तीस चाळीस स्त्रियांशीं लग्न करावें लागलें आहे.

एक काळ असा होता, कीं पुरुषानें एखाद्याच मुलीशीं लग्न केलें तरी चालत होतें. फार काय त्यानें अजिबात लग्न न केलें, तरी त्याला कोणी विचारीत नव्हते. पण ते सुखाचे दिवस आतां गेले. आतां आम्हां उरल्या सुरल्या पुरुषांचें दुर्दैव ओढवलें आणि बायकांच्या प्रचंड तापट्यांशीं लग्न करणें आम्हांला भाग पडूं लागलें आहे. करणार काय? मंत्रिमंडळ—नव्हे मंत्रीणमंडळ बायकांचें, विधिमंडळांत बायकांचें बहुमत, वर्तमानपत्रें त्यांच्या हातीं! साऱ्या कारभाराची धुरा बायकांच्या हातीं. आमचा मेला पुरुषांचा जन्मच वाईट.

कालचंच पाहा ना. मी आपला रोजच्यासारखा ऑफिसला निघालो होतो. स्टेशनजवळ आलो. तर मवाली बायकांनींसतवायाला सुरुवात केली. 'काय माल आहे' 'मारो गोली' असे आवाज त्या बायका काढायला लागल्या. प्रथम प्रथम मी दुर्लक्ष केलं. पण त्यांनीं माझा पिच्छाच पुरवला. माझ्या मागून त्या चार पांचजणी येऊं लागल्या. त्यांनीं शिट्टया घालायला सुरुवात केली. कांहीं जणी तर अभद्र, अश्लील बोलूं लागल्या आणि तोंडानें चमत्कारिक आवाज करूं लागल्या. त्याबरोबर मी संतापलो, भर रस्त्यांत थांबून मी त्यांना म्हणालो, "काय ग मेल्यानो, तुम्हाला कोणी बाप-भाऊ आहेत कीं नाहीं? सभ्य पुरुषाला एकटयाला गांठून त्रास द्यायला तुम्हाला लाज नाहीं वाटत? कां बोलावूं पोलिसीणबाईला?" असं म्हटल्यावर त्या कुठे तरी पळून गेल्या.

प्लॅटफॉर्मवर आलो, तेव्हां सगळीकडे बायकांची ही



अनुक्रमणिका

गर्दी. चार पांचशें बायकांच्या गर्दीत तीस चाळीस पुरुष प्लॅटफॉर्मच्या एका कडेला उभे होते. तरी बरं, रेल्वेनं आम्हां पुरुषांच्यासाठीं अर्धा डबा राखीव ठेवला आहे. नाहींतर या बायकांनीं गाडींत किती वेळ आमचा विनयभंग केला असता याचा कांहीं नेम नाहीं. आणि पुरुषांच्या डब्यांत तरी या उडाणटप्पू बायका आम्हांला कुठं सुखानं नांदू देतात? गाडी सुरू झाल्याबरोबर पुरुषांच्या राखीव डब्यांत दोन-चार तरी मवाली बायका शिरतात नि गर्दीचा फायदा घेऊन पुरुषांना धक्के देतात. रेल्वेच्या पोलिसीणबाई नाहींतर गार्डीणबाई यांना सांगायचं म्हणजे नसत्या कटकटी म्हणून आम्ही बिचारे पुरुष ही सारी दांडगाई खपवून घेतों झालं. पण म्हणून काय या बायकांनीं अगदींच 'हें' करूं नये.

आम्ही पुरुषांनीं आतां गांवोगांव नि गल्लोगल्लींत 'बंधु मंडळं,' 'पुरुष मंडळं' स्थापन केलीं आहेत. त्यांतून आम्ही वेळोवेळीं 'पुरुषांना समान हक्क द्या,' 'पुरुषांना चांगली वागणूक द्या' असे ठरावसुद्धां करतों, पण आमची नेहमी टिंगलच होते. कांहीं वर्तमानपत्रांत पुरुषांसाठीं खास कोपरे राखून ठेवले आहेत, पण अशीं सदरं लिहिणाऱ्या साऱ्या बायकाच. पुरुषांसाठीं दोनतीन मासिकं सुद्धां आहेत. पण तीं चालवतात स्त्रियाच. त्यांना आमच्यासारख्या पददलितांचीं खरीं दुःखं कशीं बरं समजणार? पुरुषांच्या उद्धाराच्या गप्पा साऱ्याच जणी मारतात. पण अशी नुसती ओठांची देणगी (म्हणजे 'लिप् सर्व्हिस') देऊन काय उपयोग? पुरुषांची उन्नति करण्याची स्त्रियांना खरीखुरी तळमळ आहे याचा कांहींच पुरावा आजूबाजूला दिसत नाहीं. विधिमंडळांत पुरुषांच्यासाठीं खास राखीव जागा असाव्यात अशी मागणी गेल्या वर्षीच्या 'अखिल भारतीय पुरुष परिषदे'नें केली होती. पण कांहींतरी घटनात्मक मुद्दा काढून पंतप्रधानीणबाई आणि राष्ट्राध्यक्षीणबाई यांनीं या मागणीला वाटाण्याच्या अक्षताच लावल्या! काय म्हणे, तर घटनेनुसार स्त्रिया आणि पुरुष समान आहेत. पण प्रत्यक्षांत आहेत का, हें सांगा कीं. आम्हांला पदोपदीं बायकांकडून छळ सोसावाच लागतो ना?

परवांच त्या सीता गडकरीणबाईंचं 'एकच प्याली' नाटक पाहायला गेलो होतो. त्या नाटकांतल्या सिंधूला दारु प्यायचं व्यसन लागतं. ती परमिट तरी काढते. पण त्या बाईनं दिवसभर पिऊन सुधाकराचा छळ तरी किती करायचा! आणि सुधाकरची बहीण जेव्हां त्याला हें असलं व्यसनी घर सोडायला सांगते, तेव्हां तो बायल्या सरळ सिंधूचे पाय धरतो आणि म्हणतो, "पत्नी ही पुरुषांची देवताच आहे. हे पाय मी सोडणार नाहीं." मग आतां यांत पुरुषांची शोभा ती काय राहिली? आणि ही म्हणे आमची भारतीय परंपरा! असंच एक जुनं नाटक पाहायला गेलो होतो. त्यांतली नटीच पुढाकार घेत होती. प्रथम ईशस्तवन केलं तें तिनंच. मग पडद्याकडे पाहून ती म्हणते कशी, "अहो, तुमचं घरांतलं काम आटोपलं असलं, तर जरा बाहेर येता का?" त्यावर सूत्रधार शर्टाला हात पुसत येतो नि म्हणतो, "अजून स्वयंपाक सुद्धां आवरायचा आहे. पण काय आज्ञा आहे?" मग नटी म्हणते, "आज येथें जमलेल्या रसिकवृंदास एखादें सुंदर नाटक दाखवीन म्हणते. तर तुम्ही आपली उष्टी खरकटी आटपा. मी नाटकाची व्यवस्था करून येतेच."

असा आजकालचा जमाना बदलला आहे. वर प्रत्येक वेळीं ऐकून घ्यावं लागतं, "तुम्ही पुरुषांनीं हजारों वर्षं अंमल गाजवलाच ना? मग आतां आमचे दिवस आले म्हणून नाक कशाला मुरडतां?" आमच्या पूर्वीच्या पिढ्यांतील कोण्या पुरुषांनीं नवरेशाही गाजवली असेल ती असो. त्याचें प्रायश्चित्त आम्हांला काय म्हणून? पण तक्रार करून काय फायदा? पावसानें आणि बायकोनें झोडपलें तर सांगणार कुणाला?

ऑफिसांत पोहोंचलों, तेव्हां फार तर दहा मिनिटें उशीर झाला असेल. पण सुपरिंटेंडबाईनीं केबिनमध्यें बोलावून चांगली हजेरी घेतली. मला नेहमीं हीच भीति वाटते. अशा धमक्या देऊन ही बाई कधींतरी मला स्वतःशीं लग्न लावायला भाग पाडणार कीं काय? आधींच माझी बत्तीस लग्नं झालीं आहेत. त्या बायकांच्या तडाख्यांतून सुटावं म्हणून ऑफिसांतले क्षण तरी जरा निवांतपणें जावेत म्हटलं, तर इकडं ही बया अगदी टेकीस आलेली. ऑफिसांतल्या साऱ्या पुरुषांना हीच भीति वाटते. पण तिच्याशीं लग्न करण्यापेक्षां आपण राजिनामा देऊं असं साऱ्या पुरुषांनीं एकमेकांजवळ बोलून दाखवलं आहे.

स्त्रियांच्या हातीं देशाचा कारभार आल्यावर त्यांनीं प्रथमच जर कांहीं केलं असेल, तर तें म्हणजे एक-पत्नित्वाचा कायदा रद्द केला. फार काय, पण स्त्रियांत असंतोष पसरूं नये म्हणून अधिक स्त्रियांशीं लग्न करण्याचें पुरुषांना उत्तेजन देणारे कायदे केले. अहो किमान वीस बायका असल्यावांचून सरकारी नोकरींत आधीं प्रवेशच मिळत नाहीं. आतां एक मात्र सुख आहे, कीं या बायकांना पोसण्याची जबाबदारी पुरुषांवर राहात नाहीं. कारण साऱ्या बायका मिळवत्या आहेत. कां असूं नयेत? प्रत्येक नोकरींत स्त्रियांना अग्रहक्क

माझा (च) धडधडित विनयभंग

नाहींतर ते दिवस "असे" होते





अनुक्रमणिका

असतो. या भरमसाट लग्नांमुळं असं झालं आहे, कीं आपल्या सर्व बायका कुठंकुठं राहात आहेत हें बहुतेक पुरुषांना नक्की सांगतां येत नाहीं. रस्त्यांत मवेंच एखादी अगदीं अपरिचित चेहऱ्याची स्त्री हात धरते आणि म्हणते, "अंय्या, इकडं कुठं तुम्ही? बरं झालं बाई भेटलात. आज आपल्या लग्नाचा वाढदिवस नाहीं कां?" अशा परिस्थितींत त्याला ही आपली बायको आहे कीं नाहीं याची खात्री नसली, तरी तो विचारा तिच्याबरोबर जातो. कारण नाहींतर ती सरळ त्याला पोलीस ठाण्यावर घेऊन जाऊं शकते. बायकोला टाकणं किंवा अमुक एक स्त्री आपली बायको आहे हें नाकारणं या गुन्ह्यांना फार कडक शिक्षा ठेवल्या आहेत. बायकांची जी गत, तीच मुलांची. कुठं तरी सिनेमाला नाहींतर फिरायला जावं आणि अनेक मुलांनी "बाबा बाबा" म्हणून आपल्या भोंवतीं गराडा घालावा—त्यांतहि मुलीच अधिक असतात—असं अनेकदां घडतं. वरं, कुणी सांगावं? हीं आपलीं मुलं असतीलहि या विचारानं पुरुष त्यांना चॉकलेट-गोळया देऊन स्वतःची सोडवणूक करून घेतात.

मला सगळयांत जर कशाची अधिक भीति वाटत असेल, तर ती रात्रीं अपरात्रीं टॅक्सींतून एकटं जायची. कारण टॅक्सी चालविणाऱ्या बायका फारच आगाऊ असतात. एकटया-दुकटया पुरुषाला त्या कुठं पकडून नेतील नि काय करतील याचा नेम नसतो. परगांवहून आलेल्या पुरुषांना असं अज्ञात स्थळीं पळवून नेऊन त्याच्याशीं जबरीनं विवाह केलेल्या अनेक टॅक्सी ड्रायव्हरीणबाईंचीं उदाहरणं वर्तमानपत्रांत वाचायला मिळतात.



**आपल्या मुलीचा वाढदिवस आहे ।**
**घरीं या जेवायला !!**

असो. तर सांगत काय होतो, कीं ऑफिसला दहा मिनिटेंच उशीरां गेलों असेन नसेन. पण सुपरिटेंडबाईनीं आपली हुकूमशाही गाजवलीच. मीहि मनांत म्हटलं, ठीक आहे. आम्हांला हिच्या हाताखालीं दिवस काढायचे आहेत ना? मग उलट बोलून सांगतोय् कुणाला? आमच्या सेक्शनमध्यें पंचावन्न बायका आणि फक्त सहा पुरुष ! त्यामुळं स्त्रियांच्या विरुद्ध मोठया आवाजांत बोलायचीहि सोय नाहीं. पण जेवणाच्या वेळीं आम्ही पुरुष—पुरुष जमलों, म्हणजे मात्र जरा मोकळया मनानं गप्पा होतात.

जेवणाच्या सुटींत मी, सखाराम, अप्पासाहेब, वसंत आणि गोविंदराव पान खायला म्हणून बाहेर पडलों. जयवंतच्या कुठल्याशा बायकोला मॅटर्निटी होममध्यें पोहोंचवायचं होतं, म्हणून त्यानं आज रजा घेतली होती. आम्ही पान खायला बाहेर पडल्यावर उघडपणेंच सांगितलं, "अरे वसंता, या सुपरिटेंडबाईची नजर व चांगली दिसत नाहीं. उगीच कांहीं तरी निमित्त काढून केबिन बोलावते आणि पांचदहा मिनिटं उशीर झाला, तरी तेवढीच ज बसवायची संधि घेते. पण मी साफ सांगतो, अशा डावपेंचानं मी तिच्याशीं लग्न करायच्या खोडयांत पडणार नाहीं."

"बरोबर आहे. अरे, परवां संध्याकाळीं मी ऑफीस सुटल्य घरीं निघालो होतो. पण या वयेनं केबिनमध्यें बोलावून घे म्हणते कशी, मिस्टर वसंतराव, इतकी घाई कशाला करतां जायची ? मी सोडीन तुम्हाला माझ्या गाडींतून, पण तिची ल गोडी मी लगेच हाणून पाडली. मी म्हटलं "माझ्या दोन बायका ब आल्या आहेत. त्यांच्या बरोबर मी सिनेमाला जाणार आहे. तेवढयावर ती गप राहते थोडीच? मला म्हणाली, 'ठीक आहे. पुन्हां केव्हां तरी आपण जाऊं, हो ना गडे?' आतां तुम्हीच सा ऑफिसरनं कारकुनांशीं अशी लाडिक भाषा करणं बरं का?" व सात्विक संतापानें म्हणाला.

अप्पासाहेबांनीं आपलाहि एक अनुभव सांगितला, "आत्तां म वय पंचेचाळिशी उलटून गेलं. मी बरा आणि माझ्या सत्ता बायका बऱ्या असा सीधा मांणूस मी. पण या वयेनं गेल्या शनिव कोणी नाहीं असं पाहून केबिनमध्यें माझ्या पाठीवर चक्क फिरवला. मी चमकून म्हटलं 'हें काय साहेब?' तर ती म्हणा 'कांहीं नाहीं मिस्टर अप्पासाहेब, शर्ट पाठीमागून जरा चुरम होता, तो सरळ केला. तुमच्यासारख्या ऐन उमेदींतल्या पुरुषांनीं गबाळं राहायचं नाहीं हं. मी तुम्हाला चांगलं टेरिलिनचं कापड प्रे देईन.' मी लगेच सांगितले, 'छेः छेः इतर स्त्रियांच्याकडून कस प्रेझेंट स्वीकारायला माझ्या बायकांनी बंदी केली आहे.' पण मा या निरपेक्षततेचा परिणाम काय झाला, माहित आहे ? माझ्या टेबलावर रोज जास्त जास्त काम येऊन पडूं लागलं."

अशीं आम्ही गाऱ्हाणीं सांगत असूं. कचेरींत सारा बायक सुळसुळाट. आवाज उंच करून बोलायची चोरी. जेवण अ चहाच्या वेळींच काय ती थोडी फार उसंत मिळे. ऑफि सात तास खर्डेघाशी करायची नि मग घरीं धुसफुसत जायचं. घ गेलं, तरी पुनः बायकोच्या सत्तेंत राहायचं. चार दिवस या बाय कडे, चार दिवस त्या बायकोकडे असं दर चार सहा दिवसांनीं घेऊन जोगवा मागत हिंडायचं, हेंच या स्त्री राज्यांत आम्हा पुरु जिणं झालं आहे. पुरुषांनीं या पूर्वीं हजारों वर्षं स्त्रियांच्यावर अं गाजवला असेल, पण असं आठवडयांतून दोनदां त्यांना बॅगा घे कधीं हिंडावं लागलं नाहीं. असो. परमेश्वरीणबाईची इच्छा!

गेल्या आठवडयांत मी सिनेमाला गेलो होतो. मी आधी मर सिनेमा क्वचितच पाहतो. पण त्या दिवशीं एक बायको माहेरी होती नि माझा मित्र ज्ञानेश्वर याचीहि बायको तिच्या मावशी गेली होती. हा सुदिन साजरा करावा म्हणून आम्ही 'बायको म नये आपली' हा सिनेमा पाहायला गेलों. आमच्या दोन्ही बा स्त्रियाच स्त्रिया बसल्या होत्या. चित्रपट—गृहांत अंधार पडा




अनुक्रमणिका

अवकाश. त्या स्त्रियांनीं लघळपणा करायला सुरुवात केली. आम्ही दोघे लाजून लाजून जात होतों, तसा त्या बायकांना जास्तच धीर येत होता. सिनेमा पाहात असल्याचं दाखवून त्या आम्हांला कोपरानं धक्के मारीत होत्याच. पण मग माझ्या शेजारच्या बाईनं चक्क माझा हात धरून खुणेनं दाबला. ज्ञानेश्वरला सुद्धां त्याच्या शेजारणीनं चिमटा काढला. मग मात्र आम्हाला हा छळ सहन होईना. कारण मागून दोघीजणी आम्हाला पायांनीं डिवचीत होत्याच. हा सिनेमा आहे कीं साठमारी आहे अशा वैतागानें आम्ही दोघं उठलों आणि चित्रपट अर्ध्यावरच टाकून घरीं परतलों.

त्यानंतर दुसऱ्याच दिवसाची गोष्ट. मला एक निमंत्रण पत्रिका आली. आमचा मित्र सदानंद पाटणकर याचा विवाह होता. अजून तो वराच तरुण होता, हे त्या पत्रिकेवरूनच दिसत होते.

आमची कन्या कु. मालती
हिचा विवाह सौ. वासंतीबाई पाटणकर यांचे
चिरंजीव श्री. सदानंद यांच्याशीं होणार
आहे. श्री. सदानंद यांचा हा फक्त
अकरावा विवाह आहे.
—सौ. रेखा नाबर

म्हणजे त्या सबंध पत्रिकेंत मुलीच्या किंवा मुलाच्या वडिलांचा नामनिर्देशहि नव्हता. आणि सदानंदाचा हा फक्त अकरावा विवाह असल्याची मात्र प्रौढी मिरवली होती. मी मागे 'टिन् पॉट अँड टिन् पॉट' कंपनींत काम करीत होतों, तेव्हां सदानंद माझ्या हाताखालीं होता. मोठा गुणी मुलगा. म्हणून मी मुद्दाम त्याच्या लग्नाला गेलो.

लग्नसमारंभांत अर्थातच स्त्रियांची चिक्कार गर्दी होती. सदानंदची आई स्वागतासाठीं उभी होती. ती सहास्यमुद्रेनें मला म्हणाली, "काय हो, तुमच्या चार सहा बायका केव्हांपासून येऊन थांबल्या आहेत. नि अजून तुमचा पत्ता नाहीं ? आणि बाकीच्या बायकांना तरी आणलं आहे कीं नाहीं?"

"नाहीं. टॅक्सींत तीनच जागा होत्या. म्हणून दोघींना घेऊन आलों आहे. बाकीच्या येतील मागाहून" असें म्हणून मी आंत गेलों. सगळया बायकांना आणायचं, तर ट्रकच हवी होती हें तिला कळायला पाहिजे होतं.

लग्नाची घटिका भरत आली. दोन्ही भटजीणबाईनीं आंतरपाट उंच करून नवऱ्या मुलाला आणायला फर्मावलं. नवरी मुलगी केव्हांच येऊन धीटपणें पाटावर उभी होती आणि आलेल्या स्त्री-पुरुषांकडे ताठ मानेनें पाहात होती. थोड्याच वेळांत सदानंदच्या मामीनें त्याला हाताला धरून आणलें. तो बिचारा खूपच घाबरला होता आणि लज्जेनें चूर होऊन खालीं मान घालून मामीच्या आधारानें आंतरपाटाकडे येत होता. मंगलाष्टकें झाली. सदानंदानें लाजत लाजत प्रथम वधूच्या गळयांत हार घातला. मग तिनें त्याच्या गळयांत हार घातला आणि 'ताराबळं चंद्रबळं'च्या गजरांत लग्न एकादांचे पार पडलें. लग्नाच्या वेळीं नवऱ्या मुलाला पाकशास्त्राची कित्येक पुस्तकें भेट म्हणून आलीं.

जेवतांना उखाणे आणि नांव घेण्याचा समारंभ झाला. सदानंद नांव घेतांना अनेकदां चुकला. कारण एकदां तो 'नलिनी माझ्या प्रीतीची' म्हणाला तर दुसऱ्यांदा 'शेवंती माझ्या प्रीतीची' म्हणाला, त्याच्या इतर बायकांची नांवें एकसारखीं त्याच्या तोंडीं येत असत. पण अखेर त्यानें नव्या बायकोचें नांव एका कागदावर लिहून घेतलें आणि ते वाचून दाखवून उखाण्याचा समारंभ कसा बसा पार पाडला. माझ्याहि दोन चार बायकांनीं नांवें घेतल्याचें माझ्या कानावर आलें. पण तिकडे लक्ष न देतां मी आपला खालीं मान घालून जेवत होतों.

तीन चार तास बायकांच्या आणि स्त्रियांच्या प्रचंड घोळक्यांत राहून माझा जीव अगदीं घुसमटून गेला होता. मी हळूच बाहेर सटकलों आणि चौपाटीवर मोकळया हवेवर जायला निघालो. पण मी चार पावलें जातो न जातों तोंच 'अहो अहो' अशी एक अपौरुषेय हांक माझ्या कानीं आली. मागे वळून पाहतो, तर एक सुंदर तरुण स्त्री माझ्या अगदी जवळ येऊन म्हणाली, "हें काय ? आपल्या मुलीचा वाढदिवस नाहीं का आज?"

मी आठवणीला ताण देऊन पाहिलें. माझ्या एका बायकोसारखी ती दिसत होती खरी. पण ती माझी बायको वरीच बारीक होती नि ही तर चांगली सुटली होती. तरी पण मी सावधपणें म्हटलें, "हां. हां. त्या वाढदिवसाचं होय?"

"अहो मी काल ऑफिसमधें फोन केला, तेव्हां तुम्ही बाहेर गेला होतात. म्हणून मी निरोप ठेवला होता कीं मुलीचा वाढ दिवस आहे, घरीं या दुपारीं जेवायला."

आतां खरं म्हणजे मला पागनीसनें तसा कांहींसा निरोप दिला होता. पण कुठली बायको आणि कुठली मुलगी याचा खुलासा असल्याशिवाय त्या निरोपावरून मी काय समजणार? तेव्हां तो निरोप मला मिळालाच नाहीं अशी बतावणी करून मी तिच्याबरोबर गेलों. तिच्या सांगण्यावरून मग माझ्या लक्षांत आलं, कीं ती दोन महिने माहेरीं गेली होती त्यामुळं अशी फुगून आली होती. त्यावेळीं वास्तविक चार वाजायला आले होते, पण बायकोच्या आणि मुलीच्या आग्रहानं त्या अवेळींहि मी पुन्हा जेवलो आणि लवकरच त्या घरीं थोडया दिवसांसाठीं तरी राहायला येण्याचें अभिवचन देऊन बाहेर पडलो.

पण तेवढयावर कुठें संपायला? मी बसमधें बसलों. पुढच्या बाकावर दोन स्त्रिया बसल्या होत्या. मागच्या बाकावर दोघीजणी बसल्या होत्या. मधल्या बाकावर एकच स्त्री बसली होती. म्हणून मी भीत भीतच तिच्या शेजारीं बसलो. कंडक्टरीणबाई आली. "तिकीट" म्हटल्यावर मी पैसे काढूं लागलो. इतक्यांत मागच्या बाकावरची बाई म्हणाली, "हे घ्या त्यांच्या तिकिटाचे पैसे" असं म्हणून तिनं कंडक्टरीणबाईच्या हातांत एक नोट दिली. बहुधा ती माझी एखादी बायको असावी या विचारानं गप्प बसणार इतक्यांत पुढच्या बाकावरची एक बाई मागे वळून म्हणाली, "अहो, ते माझे मिस्टर आहेत. त्यांचं तिकीट मीच काढणार" असं म्हणून तिनंहि एक नोट कंडक्टरीणकडे दिली. आतां मात्र पहिली बाई—की बायको—म्हणाली, "वा ग वा! यांनीं चांगला चार वर्षं संसार केला आहे माझ्याशीं. आणि आतां तू लगट करायला लागली आहेस काय?" हें ऐकतांच दुसरी बायकोहि खवळली. ती ओरडली, "तुझ्या लग्नाला चारच वर्षं झालीं असतील. पण माझ्या लग्नाला साडेसहा वर्षं झालीं आहेत. मीच सीनियर बायको आहे."

"पण तिकिटाचे पैसे मीच आधी दिले आहेत. तें काहीं नाहीं. कंडक्टरीणबाई, तुम्ही माझेच पैसे घ्या," असं म्हणून पहिल्या बायकोनं हेका धरला.

मग दोघींची तुफान बोलाचाली झाली. कंडक्टरीणबाई ओरडली, "तुम्ही दोघीहि गप्प बसा पाहूं. हे माझेच मिस्टर असावेत असं मला वाटतंय्. खिशांतून लग्नाचा फोटो काढूं लागली. मग मात्र मी चांगलाच घाबरलो. आतां या सगळया बायकांच्या तडाख्यांत माझी कांहीं धडगत नाहीं हें मी ओळखलें. मी सरळ उठलो आणि धांवतच बसच्या दरवाज्यापाशी गेलो. स्टॉप येण्यापूर्वीच मी बसमधून उडी टाकली आणि लंगडत लंगडत घरीं आलों.

तळीरामाचा रोग बरा करतो म्हणून सांगणारा एकच डॉक्टर आणि एकच वैद्य होता. पण या बायकी राज्यांत आमच्यावर हक्क सांगणाऱ्या अशा अनेक बायका असतात. एका कुटुंबाचा एकत्र फोटो घ्यायचा म्हटलें, तर तें विमानांतून किंवा उंच इमारतीवरूनच शक्य आहे. आणि तेंहि सर्व 'कुटुंबीय' मंडळी गुण्यागोविंदानें फोटोसाठीं उभी राहिली तर! कोणाला घरीं जेवणाचें किंवा चहापाण्याचें निमंत्रण द्यायचें, तर 'सहकुटुंब सहपरिवार' असे शब्द घालण्याची सोय उरली नाहीं. नाहींतर जेवणाचें गांवजेवण व्हायचें.

आजचीं वर्तमानपत्रें उघडलीं, तर या स्त्रीराज्यांत विचारांचा काय आनंद आहे, हें सहज दिसून येईल. उदाहरणार्थ 'बँकांचें राष्ट्रीयीकरण' या विषयावरील एका अग्रलेखांतील उतारा पहा: "बँकांचें राष्ट्रीयीकरण करावें असें कामगार-नेत्या सौ. मीनाबाई घोत्रे यांनीं कालच्या सभेंत जोरजोरानें सांगितलें. वास्तविक, या बाईना या विषयावर बोलण्याचा अधिकार तरी काय? यांनीं किंवा यांच्या मिस्टरांनीं अजून एका तरी बँकेचें राष्ट्रीयीकरण केलें आहे काय?" आधीं करावें नि मग बोलावें ही वृत्ति आमच्या अंगीं कधीं येणार?

पण घोत्रेबाईंच्या विधानाला आमचा महत्त्वाचा विरोध आहे तो अशासाठीं कीं या भाषणाच्या वेळचा त्यांचा वेष अगदीच भोंगळ होता. लालभडक साडीवर निळा ब्लाउज मॅचिंग होत नाहीं हें साधें तत्त्व जिला कळलें नाहीं, ती बाई बँकांचें राष्ट्रीयीकरण काय करणार कपाळ! आणि पायघोळ साडीची फॅशन जुनी झाली हें जिला समजत नाहीं, तिच्यापासून नव्या विचारांची कसली अपेक्षा करायची? अपौरुषेय संपादकांचा विचार विलास हा असा असतो.

अशीं एक कीं दोन, या स्त्री-राज्यांत पुरुषांचीं दुःखं अनेक आहेत. कोणतंहि मासिक हातीं घेतलं, कीं पुरुषांच्या उत्तान चित्रांनीं सजवलेलीं त्यांचीं मुखपृष्ठं पाहून आमच्या माना खालीं होतात. पोहण्याच्या वेषांतले पुरुष मासिकांतल्या कथेंत, जाहिरातींत, रस्त्यावरच्या फलकांवर जिथं तिथं दिसतात. 'रामराज्य' हे आदर्श राज्याचें स्वप्न जाऊन तिथं आतां कृष्णराज्य करण्याची भाषा सर्वत्र ऐकूं येत आहे. चेकाळलेल्या अश्लील लेखिकांवर खटले चालू आहेत. आणि या लेखिका चक्क पुरुषांच्या नांवावर लिहून पुरुषांची बदनामी करूं लागल्या आहेत. परवांच एका लेखिकेवर अश्लील लिहिल्याबद्दल खटला भरला. त्याचा निकाल म्हणून न्यायाधीशबाईनीं तिला एक महिना सक्तमजुरीची शिक्षा दिली आणि शेवटी सांगितलें कीं, "तुम्हांला या शिक्षेविरुद्ध वाटल्यास अपील करतां येईल." त्यावर ती चहाटळ मेली विचारते कशी, "मला सेक्स अपील करतां येईल का?" अशा पुरोगामीच नव्हे, तर आक्रमक स्त्रियांची बहुसंख्या असलेल्या या राज्यांत पुरुषांना तोंड दाबून बुक्याचा मार सहन करावा लागला तर नवल काय?

● ● ●

## बिनलग्नाचा बाप?

सिद्धार्थच्या इंग्लिश असोसिएशन तर्फे डिबेटिंग होते. विषय होता 'Unmarried professors teach better than the married professors.' दोन्हीं पक्षाची प्राध्यापक मंडळी हिरीरीनें मुद्दे मांडत होती. अविवाहितांना वाङ्मयांतला कांहीं भाग अनुभव नसल्यानें शिकवतां येणार नाहीं असे म्हटलें कीं, दुसऱ्या बाजूनें विवाहित लोकांचे अनुभव घेण्याकडेच चित्त असल्यानें त्यांचे शिकवण्याकडे लक्ष लागणार नाहीं असें म्हटले जाई. अविवाहितांच्या बाजूनें बोलायला प्राचार्य कणिक उभे राहिले. (वादविवादापुरते ते आपले कुटुंब विसरले असावेत.) अविवाहित प्राध्यापक चांगले शिकवतात असें म्हणून त्यांनीं झेविअर कॉलेजमधल्या फादर्सचे उदाहरण दिले. झेविअर कॉलेजमध्यें शिकवणारे फादर्स अविवाहित असल्यानें ते चांगले शिकवतात असें बोलण्याच्या ओघांत 'So these unmarried Fathers...' असे शब्द एकापुढें एक आल्यावर विद्यार्थ्यांनीं टाळया पिटून व हंसून सभागृह डोक्यावर घेतलें.

संग्राहक—माधव अत्रे






# बाई

—रा. रं. बोराडे



ज्ञानबा जमादार दचकला. आपली आतां धडगत नाहीं हें त्यानं ओळखलं. पण त्यापेक्षां एका दुसऱ्याच गोष्टीची त्याला भीति पडली ही "दुसरी गोष्ट" म्हणजे.... पण तुम्हींच ठरवा ना वाचून !!

**जत्रा** चिक्कार भरली होती. वारुळांतून बाहेर पडलेल्या मुंग्या-वनी माणसं दिसत होतीं. कुणाचा थांग कुणाला लागत नव्हता. एकदां या गर्दीत चुकामुक झाली तर लवकर भेट होण्याची शक्यता नव्हती. म्हणून माणसं हातांत हात घालून चालत होती.

नामा-गोपाळानंहि एकमेकांच्या हातांत हात घातला होता आणि अंवती भंवती नजर टाकीत दोघंहि चालले होते. असं चालतां चालतां नामाची नजर एका लिंबाच्या सावलींत शिरली. त्यानं कांहीं वेळ तिकडं निरखून पाहिलं व गोपाळाचा हात दाबीत तो म्हणाला "ए, तिकडं फायलंस का ?"

आस पास पाहत गोपाळनं विचारलं—

"कुठं रं ?"

"आरं त्या लिंबाच्या झाडाखालीं."

गोपाळनं लिंबाच्या झाडाखालीं पाहिलं. लिंबाच्या झाडाच्या सावलींत एक गाडी सुटली होती. गाडीच्या चाकाला एक घोडं बांधलं होतं. व झाडाच्या बुडाला एक सुंदर बाई चितागती बसल्यावनी बसली होती. यापैकीं नामाला काय दाखवायचं आहे हें लक्षांत न आल्या-मुळं त्यानं विचारलं "काय हाय तिथं ?"

त्याच्या खांद्याला आपल्या खांद्याचा घुसडा मारीत तो म्हणाला—

"आरं ती बाई न्हवं का."

त्या बाईला न्याहाळीत गोपाळानं विचारलं—

"तुज्या वळकीची हाय का. ?"

"माज्या कुठली वळकीची."

'मंग ?"

"तिच्याकडं चल जरां."

"कां ?"

"तूं चल तर खरं."

"तुला असल्या भानगडी करीत बसायची लई सवं हाय गड्या."

"आरं भानगडी केल्याशिवाय भागतं कुठं माज्यासारक्याचं."

असं म्हणत नामानं त्याच्या हाताला धरून ओढीत लिंबाच्या झाडा-खालीं आणलं. बाईनं नजर उचलून त्यांच्याकडं पाहिलं आणि ती सावरून बसली.

नामानं गोपाळाला डोळा मारीत विचारलं—

"कारं, पानी मिळंल का हितं कुठं?"

आस पास पाहिल्यावनी करीत गोपाळा म्हणाला —"काई दिसत न्हाई गड्या."

नामानं बाईकडं पाहत विचारलं—

"काओ बाई, पानी मिळंल का हितं कुठं ?"

बाईनं एकवार त्यांच्याकडं पाहिलं आणि मंजूळ आवाजांत ती म्हणाली—

"त्या तिथं हाटिलांत मिळंल की."

बोलण्याला अशी सुरुवात झाल्यावर नामानं आपलं घोडं पुढं दामटिलं.

"कुन्या गांवचं बाई तुमी ?"

"लांव तिकडची, वारसीकडची हाय म्या."

"जतरंला आलाव का ?"

"व्हय !"

"एकट्याच आलाव का ?"

नामानं असं विचारलं तेव्हां बाईला एकदम रडूं फुटलं. हमसून हमसून ती रडूं लागली. दोघांनीहि चमकून एकमेकाकडं पाहिलं. बाईनं एकदम असं कां रडावं हें त्यांच्या लक्षांत येईना. बाई थोडा वेळ रडत राहिली. तिचं रडणं आतां कांहींसं कमी झालेलं आहे असं दिसतांच नामानं विचारलं–

"काय झालं बाई ?"

डोळ्यांतलं पाणी पुशीत बाई म्हणाली–

"जतरंला चल म्हनून मला माज्या नवऱ्यानं हितवर आनलं आन् तूं मला लागत न्हाईस म्हनून हितं सोडून दिलं"

"तुमी कसं जाऊं दिलं ?"

"माज्या हाताला झटका मारला आन् कुठल्या कुठं पसार झाले. मोप हुडकिलं. सारी जतरा पालथी घातली आन् तपास लागंना तंवा हितं अशी बसले."

"जमत न्हवतं का त्येचं-तुमचं ?"

"जमत असतं तर कशाला आसं सोडून दिलं असतं."

"मंग आतां कसं करताव ?"

"काय करूं, मला तर बाई सुसंना झालंय. पदरीं ऐकांदा अडका न्हाई का, मला आतां वाटबी गवसायची न्हाईं."

"म्हायेराचं आसंल की कुनी?"

"म्हातारी माय तेवढी हाय"

नामा गोपाळाला डोळा घालीत म्हणाला–

"मंग आसं करा. हितनं जवळच आमचं गांव हाय. तुमी आतां आमच्या गांवाला चला. चार-दोन दिवस आमच्या घरीं रावा तंवर आपून तुमच्या मायला पतर घाडूं. अस्यानं असं झालंय म्हणून कळवूं. ती मंग यिऊन घिऊन जाईल तुमाला."

"तुमी कशाला तरास घेताव ?"

"ह्यांत कसला तरास हाय. चला, आटपा लवकर."

बाई बोचकं बांधू लागली तेव्हां नामा म्हणाला–

"च्या-पानी काई केलाव का न्हाई ?"

"सकाळधरनं काई खाल्लंच न्हाई तर च्या–पानी कुठलं व्हायला."

"मंग आसं करतो. आमी त्या म्होरच्या हाटिलांत च्या–पानी करतो आन् तुमालावी काई खायला घाडतो."

बाईचा चेहरा उजळला. ती हसून नामाकडं पाहत म्हणाली–

"वरं."

हॉटेलाकडं जातां जातां गोपाळा म्हणाला–

"कस्याला बला लावून घेतलीस ही म्हाग ?"

नामा गालांत हसत म्हणाला–

"आतां हिला बला म्हनायचं का ?"

"मंग काय म्हनायचं तर ?"

"आरं ही तर शिकार हाय. हुडकायला गेलं तरी मिळायची न्हाई आसली शिकार."

"आतां तिच्या मायीचा तपास लावीत बसनार का ?"

"छया, तपास न्हाई का काई न्हाई. तपास करतोय म्हनून तिला सांगायचं आन् तिला घरांत ठिवून घ्यायचं."

"आन् कायमची चिकटली तर ?"

"चिकटली तर चिकटली. लगनाची मिळत न्हाई तंवा हीच सही."

"तुला वरं कळालं रं ही अशी अडचणींत हाय म्हणून" नामा हसत म्हणाला.

"आरं ही तर ह्यांतली खरी खुबी हाय. आसं चलत चलतच मानूस पारखावं लागतं."

एवढ्यांत हॉटेल आलं. नामानं तिच्यासाठीं पेढे पाठविले. चिवडा पाठविला. गोपाळासाठीं आणि आपल्यासाठीहि फराळाचं मागविलं. चहा घेतला. विल भागविलं आणि दोघंहि परत लिंबाच्या झाडाखालीं आले. तोपर्यंत बाईचंहि सारं आटोपलं होतं. नामानं तिच्याकडं पाहात सलगीच्या आवाजांत विचारलं.

"आवडले का पेढे चिवडा ?"

बाई तिरप्या नजरेनं त्याच्याकडं पाहात आणि गालांत हसूं खेळवीत म्हणाली –

"तुमी दिल्यावर ना आवडायला काय झालं."

तिच्या तेवढ्याच बोलण्यानं नामा खूप झाला. आणखी सलगी दाखवीत म्हणाला.

"मंग आटपा वरं. चला लवकर."

बाईनं काखंत बोचकं मारलं आणि त्यांच्या मागोमाग ती चालूं लागली. नामा आणि गोपाळा पुढं पुढं चालूं लागले आणि ती त्यांच्या मागोमाग चालूं लागली. गांवांत आल्यानंतर नामा घाईंत असल्यावनी म्हणाला–

"वरं गोपाळा, आतां चलतो आमी."

गोपाळानं ठसत त्याला विचारलं.

"कारं लई, घाई सुटली का ?"

नामा लाजत वोलल्यावनी बोलला–

"तसं काओ न्हाओ"

"मंग आसं कर. अदोगर माज्या घरीं चला. बाओ च्या करत्याल. च्या घेऊन जा फायजी तरं."

"वरं तसं का हुईना."

घरीं आल्यानंतर गोपाळानं तिला चूल दाखविली, चहाचं सारं साहित्य तिच्याजवळ ठेवलं व तो बाहेर आला. ओटरीवर नामाजवळ बसला.

चहा घेऊन झाल्यानंतर नामा म्हणाला,

"वरं मंग, आमी चलतो आतां."

हातांत अडकित्ता खेळवित गोपाळ म्हणाला–

"सध्यां पुरतां एकटाच जा तूं. बाईला म्या म्हागनं धाडतो. नामानं आश्चर्यानं विचारलं–

( पृष्ठ ४८ वर पहा )







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



सिंधूच्या तीरावर, हिमालयाच्या परिसरांत आमच्या जिव्हाग्रीं नेमकी देववाणी यावी हा मला मोठा शुभशकुन वाटला. फार अर्थपूर्ण अशी ती गोष्ट होती. आम्हीं एक होतो, आमचे संस्कार ऐक होते, प्रेरणा एक होत्या.



— पु. भा. भावे

# 'जिंकूं किंवा मरूं'

**पुनश्च** आमचा प्रवास सुरू झाला. पण सिंधूनें आमची सोबत सोडली नव्हती. तिच्या कांठानेंच आम्ही जात होतों. सभोंवार रंगीबेरंगी दगडांचें जग उभे होते. जादूचे पर्वत व जादूची सिंधु ! ह्या सिंधूंत हाडें पडावींत अशी माणसें इच्छा करतात. मला जिवंतपणींच तिचा दुर्मिळ स्पर्श झाला होता. पुन्हां कशाला मला ही सिंधु दिसली असती ? पुन्हां कशाला तिचा जलस्पर्श मला झाला असता ? मी सिंधूकडे पहातच होतो. रस्ता धांवत होता. हा मार्ग कांहींसा बरा होता. धुळीचें प्रमाण किंचित् कमी होते व धक्क्यांचें प्रमाण बरेच कमी होते. तरीहि सत्तरऐंशी क्रोशार्धांचें अंतर संपवीपर्यंत सायंकाळ झाली. सकाळपासून सायंकाळपर्यंत प्रवास चालू होता. सायंकाळीं आम्ही छावणीवर आलों. ही छावणी पुन्हां एका फार सुंदर स्थळीं वसलेली होती. चोहों अंगांनीं खेटून आलेले ऊंच डोंगर व एका चिंचोळ्या दरींत वसलेली ही छावणी. शेजारींच नदी वहात होती– महानदी सिंधु ! अगदीं सिंधु तीरावरच तेथें आमचे तंबू उभे होते. तिच्या पाण्याची वाहती गाणीं ऐकतच ही रात्र आम्हांला काढायची होती. अद्याप अंधेर पडला नव्हता. समोरच्या डोंगरावर ओझीं घेऊन सैनिक चढत होते. आम्हांला नुसती स्वतःची शरिरें घेऊन चार पावलें चढणें कठीण वाटत होते. तेथें ते ओझीं पाठीवर घेऊन डोंगर चढत होते ! उगाचच तो डोंगर चढणारा पाठमोरा सैनिक माझ्या ध्यानांत राहून गेला आहे. 'मोंगल तंबू'त मी वसलो होतो. मी, माडगूळकर, पु. ल. सवनीस व कानेटकर. सैन्यांतील तरुण अधिकारी आमचे क्षेम विचारून जात होते व गप्पा मारीत होते. गप्पा अनेक प्रकारच्या, पण मुलाखती युद्धाच्या ! अंधेर पडूं लागला व पडला. डोंगर अस्पष्ट झाले. तारे लकाकूं लागले. तंबूचे अंतरंग "बुखारी"नें उजळून निघाले. गप्पा रंगत राहिल्या. "युद्धस्य कथा" रम्य होत्या खऱ्या. प्रत्यक्ष युद्ध-भूमीवरच आम्ही युद्धाविषयी बोलत होतों. परंतु युद्ध शास्त्रांतले आम्हांला काय कळत होते ? कांहीं सुद्धां नाहीं. मतप्रदर्शनासाठीं लागतो तो किमान अधिकार आमच्यापाशीं नव्हता. ज्ञान नव्हते. कांहीं थोडे पाहिले, व दिसले तेवढ्या भांडवला-वर काय बोलणार? म्हणजे "अधिकारवाणीनें" काय बोलणार ? लघुकथा, काव्य, कादंबरी, नाटक, बोलपट, असा कांहीं विषय असता तर बृहस्पतीसारखे बोललो असतो. पण युद्धा-विषयीं काय बोलणार ? आमचा पराभव झाला, हे आम्हांला ठाऊकच होते. साऱ्या जगाला ते ठाऊक होते. तो कसा झाला, कां झाला ह्याविषयीं अनेक वदंता होत्या. त्या साऱ्या प्रलयांत होत्या. झालें तें पुन्हां घडूं नये ह्यासाठीं काय केले पाहिजे ? येथेंहि पुन्हां आमचा अधिकार अपुरा पडला होता. अधि-कारी माणसें ह्या विषयावर बोलून गेली होती. श्री. **यशवंतराव चव्हाणांनी**हि फार बोलके निवेदन केलेले होते. शिस्तीनें बांधलेले सेना-धिकारी आमच्याशीं काय बोलणार व आम्ही त्यांना काय विचारणार ? सरासरी आठव-ड्याचा आमचा हा लडाख आघाडीवरील दौरा होता. त्या अवधींत कांहीं स्थळें व छावण्या आम्ही पाहिल्या. आज ही शेवटची छावणी आम्ही पहात होतों. एवढ्या भांडवलावर आम्ही बोलावयाचे तरी काय ? दोन दिवस दिल्लींत, चार मुंबईंत, एक मद्रासला व एक कलकत्त्याला घालवून भारताविषयीं 'अधिकार-वाणीनें' बोलणाऱ्या शिकाऊ परस्थासारखेंच ते झाले असते. परंतु ह्या विषयावर अधिकारी माणसें बोलून गेली होती. बोलत होती. आमच्यापाशीं काय आहे, काय नाहीं, काय असावयास पाहिजे, ह्याची कांहीं दिशाहि त्यांनी दाखविली होती. मेजर जनरल **य. श्री. परांजप्यां**सारख्यांचे लेख मी वाचले होते. त्यांनी तर 'केसरीं'तील आपल्या एका लेखांत संभाव्य आक्रमणाची अचूक जागाहि आधींच दाखवून ठेवली होती. युद्ध वाङ्मय मी कांहीं थोडें वाचले

होते. रोमेल केसलरिंगसारख्या विख्यात सेनानींचीं चरित्रें वाचली होती. परंतु युद्धशास्त्राचें प्रत्यक्ष ज्ञान आम्हांपैकीं कोणाच्याच पदरीं नव्हते. आणि तरीहि एखाद्या लहान मुलाच्या उत्साहानें आम्ही सेनाधिकाऱ्यांशीं बोलत होतो. त्यांना प्रश्न विचारीत होतो. कांहीं प्रश्नांचीं उत्तरें मिळत नव्हती. साऱ्यांनीं आमच्यासमोर भडभडा बोलत सुटावे असें आम्ही तरी कोण लागून गेलो होतो? साऱ्या गोष्टी बोलण्याच्या नसतात आणि साऱ्या गोष्टी समजतहि नाहींत. रेषारंग पुरतेपणीं न भरलेले कांहीं एक पुसट चित्र आमच्यासमोर उभे झाले होते. त्या चित्राकडे आम्ही पहात होतों. अर्थ समजाऊन घेण्याचा प्रयत्न करीत होतो. रात्र वाढत होती. थंडीं चढत होती. नदीच्या साहचर्यानें थंडीला एक वेगळी धार दिली होती. तंबूतून आम्ही भोजनगृहांत गेलो. "मोंगल तंबूतू"न मोठ्या हिरव्या तंबूत. तेथें सिगारेट्सचा धूर तरंगत होता. खाणेंपिणें चालूं होतें. माणसें दोन आणि चारच्या गटांनीं बोलत होतीं. पत्ते खेळत होतीं. येथें सारे सडे सैनिक गडी होते. एरवी "रेडिओ"च्या किंचाळण्याचा मला भयंकर कंटाळा येतो पण ह्या ध्वनीयंत्राची येथील सैनिकांना मोठी सोबत होती. वायकांचे स्वर ह्या यंत्रावर त्यांना ऐकूं येत होते. बाहेरच्या जगाशीं कांहीं नातें जुळत होते. "रेडिओ" हे ह्या विजनवासांत मोठें वरदान होते. एकाकी माणासानें यंत्र सुरू करावे व अन्य माणसाचा शब्द ऐकण्याचा आनंद भोगावा, तसा आनंद माणसें येथें भोगत होतीं पण सजीव मुखांतून प्रत्यक्ष गाणें ऐकावे असें कुणाला तरी वाटले. श्री. **पु. ल. देशपांडे** ह्यांना विनंती करण्यांत आली. (अन्य कुणाला विनंती करण्यांत अर्थच नव्हता!) **देशपांड्यांनी** माडगुळकरांचे "**जिंकूं किंवा मरूं**" म्हणून दाखविले. ज्यांच्यासाठीं कविता लिहिली, त्यांच्यासमोरच तिचें गायन झाले. युद्धभूमीवर युद्धगीतांचें गायन! कवीच्या प्रत्यक्ष उपस्थितींत. तो क्षण माडगूळकर—देशपांड्यांच्या धन्यतेचा होता. दोघेहि भाग्यवान व तेथें जे उपस्थित होते तेहि भाग्यवान!

पण ह्या भाग्याची पुनरावृत्ति करणें मात्र शक्य नव्हते. देशपांड्यांचा दम, त्या एका गाण्यांतच संपला. "पुन्हां गाणें म्हटले तर मात्र मरूं" असा विनोद त्यांनी केला. ते कांहीं खोटे नव्हते. त्यांनी एक गाणें त्या विरळ वायुमानांत म्हटले हेच फार झाले. गंगेचें पाणी गंगेला मिळाले. सैनिकांचें गीत त्यांचे त्यांना पोचते झाले. नंतर गप्पा रंगत राहिल्या. जातिवंत सैनिकांना पराभवाचें शल्य बोचत होते. ते त्यांच्या बोलण्यांत दिसत होते. हा कलंक पुसून टाकण्याची एक संधि मिळाली पाहिजे, असे ते वारंवार म्हणत होते. होय, हा कलंक होता व तो पुसणेंहि आवश्यक होते. एरवीं उंच मान करून ह्यापुढें बोलणेंहि आम्हांला कठीण होते. बोलतां बोलतां बोलणें संपले. आम्ही तंबूकडे परत फिरलों. आणि यथावकाश निद्रावश झालों. झोपेची आराधना करीत असतां शेजारचे रंगीबेरंगी डोंगर मला दिसत होते. गुलाबी डोंगर, हिरवे डोंगर, पिवळे डोंगर, शेंदरी डोंगर! रंगीत डोंगरांच्या त्या प्रचंड प्रासादांत आज आम्ही झोपी जात होतो. व शेजारीं सिंधूचा हिरवा प्रवाह वाहत होता—जसा एखाद्या भव्य मणिमंडीत महालांतून पाचेच्या पाण्याचा पाट वहात जावा!

जादूनगरींतली त्या रात्रीची झोंप संपली व आम्हीं जागे झालो. आम्हीं जागे झालो तेव्हां दिवसहि जागा झाला होता. जागेपणींचे प्राथमिक व्यवहार आम्हीं आटोपले. हात-पाय तोंड धुतले, न्याहारी केली. काल गेली ती ह्या प्रदेशांतील आमची शेवटची रात्र होती. आज उजाडली ती शेवटची सकाळ होती. आतां येथें पुन्हां येणें नाहीं. ह्या कल्पनेनें पोटांत तुटले. भैरवी ऐकतांना वाटते तसें वाटले. पुन्हां ह्या सिंधूचें दर्शन कठीण, पुन्हां ह्या पर्वतांचें दर्शन कठीण! निघण्यापूर्वी आम्हीं सिंधु-तटावर फिरलो. तेथें अनेक रंगीबेरंगी दगड पसरले होते. चार-दोन दगड मी उचलले व खिशांत टाकले. पण माडगुळकर भाग्यवान! तेथेंहि ह्यांना "गणपति" सांपडला. आजवर शारदा गजाननाचा वरदहस्त त्यांचे मस्तकावर होताच. पण आज एक लालरंगी गणपति त्यांना साकार सांपडला. तो त्यांची तेथें वाटच पहात होता. एका गजाननाला दुसरा गजानन भेटला. दोघांचें जिणें सार्थकी लागलें व मग आम्हीं निघालो. मी माझे दगड घेतले व माडगुळकरांनी आपला "गणपति" घेतला चारचाकी वाहन पुन्हां धावूं लागलें. प्रवा-



चला लौकर कपडे काढा. 'वासंतिक' अंकाचीं कव्हरें भराभर करायचीं आहेत

सात्रें वर्तुळ पूर्ण करून आतां आम्हीं परत "लेह"च्या दिशेनें निघालो होतो. सिंधु अद्याप आमची साथ करीत होती. आसमंत बर्फानें शुभ्र झाले होते—जसे बोंडे फुटलेल्या कापसाचें शेत. मध्येंच आम्ही थांबलो. आमचें वय गळून पडले. बालवृत्ति जाग्या झाल्या, त्या उफाळून उठल्या. बर्फाचे चेंडू आम्हीं परस्परांना फेंकून मारले. छायाचित्र घेतले व चालते झालो. आम्हांला आज काय झालें होतें कुणास ठाऊक! पण आपापतः गीर्वाण वाणी आमच्या तोंडांतून उमटूं लागली. "उर्ध्वमूलमधः शाखं" पासून "शांताकारम् भुजगशयनम्" पर्यंत जें कांहीं संस्कृत येत होते, तें आम्हीं पांचहिजण घडाघड म्हणूं लागलो. त्यांतून रामरक्षा सुटली नाहीं कीं, गायत्री मंत्र सुटला नाहीं. "गायत्री मंत्र चार-चौघांत मोठ्यानें म्हणावयाचा नसतो" अशी सूचना आम्हांला मंत्र महाशयांनी दिला. पण आम्हीं त्यांचे कशाला ऐकतो ? आमचे घनपाठ आम्हीं चालूंच ठेवले. सिंधूच्या तीरावर, हिमालयाच्या परिसरांत आमच्या जिव्हाग्रीं नेमकी देववाणी यावी, हा मला मोठा शुभशकुन वाटला. फार अर्थपूर्ण अशी ती गोष्ट होती. आम्हीं एक होतो, खरोखर आम्ही एक होतो ! आमचे देह पांच असोत कीं पस्तीस कोट, पण आम्हीं एक होतो ! आमचे संस्कार एक होते ! आमच्या प्रेरणा एक होत्या ! आमच्या हृदयाचें स्पंदन एक होते ! "शाकुंतल," "शारदा", "सौभद्र"—पासून अनेक नाटकांतील गाणीं श्री. देशपांड्यांनी आम्हांला ऐकविली. ऐकविली कसली, उद्रेकानें तीं त्यांच्या मुखांतून बाहेर पडलीं. द्रव्याच्या मोलानें ऐकतां येतील अशीं तीं गाणींच नव्हती. परंपरा त्यांच्या तोंडानें बोलत होती. हिमालय त्यांच्या तोंडानें बोलत होता, सिंधु त्यांच्या तोंडानें बोलत होती. देशपांड्यांचें नातें "ऋग्वेदी" नामक संस्कारी पंडिताशीं होतें. ते त्यांचे मातामह होते. व येथें आतां आज आमचीं पांच-जणांचीं नवीं नातीं जडत होती. ह्यानंतर आम्हीं असें भेटूं वा न भेटूं पण आतां हे जे नातें जडले तें खरें होते—अतूट होते. हिमालय व सिंधु ह्यांच्या साक्षीनें जडलेले हें नाते होते. हें नातें व्यर्थ ठरणार नव्हते, व्यर्थ जाणार नव्हतें. येथें आम्हीं जें कांहीं बोललो, जे विचार व निर्धार केले ते आज ना उद्यां फळाफुलाला येणारच होते. त्यांचे कांहीं परिणाम होणारच होते. हिंदुस्थान, हिमालय व सिंधुवर प्रेम करणाऱ्या पांच शारदाभक्तांचे ते विचार व निर्धार होते. ते सारे विचार देशाच्या कल्याणाशीं निगडित होते. ते व्यर्थ जातील तर सारे व्यर्थ जाईल. अर्थ कशांत उरणारच नाहीं. हे विचार सांगता येतील त्या मार्गानें सांगण्याचे हें नातें अभेद्य ठेवण्याचें वचन आम्हीं परस्परांना दिले. व आम्हीं मंत्र-घोष करीत राहिलो. सकाळ संपली. दि. ३० ला दुपारीं बरोबर एक वाजतां आम्हीं लेहला येऊन पोहोंचलो "घराची" कल्पना किती सापेक्ष असते पहा ! लेहला आल्यावर आम्हांला "घरीं" आल्यासारखें वाटले. ह्या वेळीं आमच्यासाठीं स्वतंत्र तंबू उपलब्ध नव्हते. जेवणघरासाठीं वापरल्या जाणाऱ्या एका मोठ्या थोरल्या "हिरव्या तंबूनें" आम्हांला पोटांत घेतले. लेहचें वायुमान आज पालटले होते. लेहचें आकाश ढगांनीं व्यापले होतें. कार्यक्रमाप्रमाणें दिनांक ३१ ला आम्हांला लेह सोडणें होते. पण ती गोष्ट आमच्या हातांतली नव्हती. विमान वाहतुक बंद झाली होती. वायुमानाचा विश्वास नव्हता. एकदां ढग येऊं लागले म्हणजे चार-चार दिवस ते जागचे हलत नाहींत असें माणसें सांगत होतीं. ढग हलले नाहींत, तर आम्हांलाहि हलतां येणें शक्य नव्हते. थंडी वाढत होती. सायंकाळीं ती फार वाढली. येथें आतां एखादी "बुखारी"हि उपलब्ध नव्हती. पांच माणसें एवढ्या मोठ्या तंबूंत पाय दुमडून पडली होती. एकमेकांची ऊब एकमेकांना मिळावी, तर तेहि शक्य नव्हते. अशा अवस्थेंत एक जवानानें थंडीचें औषध आणून दिले. त्याचा उपयोग उत्तम झाला. थंडी बेसुमार होती. त्या मोठ्या आकाराच्या तंबूंत थंडी ठासून भरली आहे असें वाटत होते. त्या तंबूंत गार—कपाटांतल्या (फ्रिज) वस्तूसारखें आम्हांला वाटत होते. माकडटोप्या, डगले, वरकोट व घूळ ह्यांनीं सजलेले आमचे अवतार मोठे गंमतीचे दिसत होते. आज बाहेर नांवापुरतेंसुद्धां ऊन नव्हतें. सायंकाळ आहे कीं दुपार तेंहि कळत नव्हते. वर्फाळलेल्या डोंगरावरून ढग फिरत होते. डोंगरावरचें वर्फ वाढलें होतें. थंडीहि वाढली होती. केव्हांतरी बटाट्याच्या उसळीचे व रोटीचें भोजन आम्हीं घेतले. पिण्याच्या पाण्याविषयीं मला बरेच दिवस शंका होती. बाहेर उघड्यावर एक भला मोठा लोखंडी पिंप होता. त्यावर झांकण वगैरे कांहीं नव्हते. सर्व प्रकारचीं भांडीं त्या पिंपांत वेळाशक बुडविली जात. आमचें पिण्याचें पाणी तेथून येत असावें अशी मला शंका होती. भोजनाचे वेळीं पाणी समोर आले तेव्हां मी जवानाला विचारलें "हें त्या बाहेरच्या उघड्या पिंपांतले पाणी ना?" त्यानें "होय" म्हणून उत्तर दिलें. मी कावराबावरा झालो. माझ्या चेहऱ्याकडे पहात माडगुळकर म्हणाले, "अहो दादा ! ह्या थंडींत सगळे जंतु पार मरून जात असतील. तुम्हीं काळजी करूं नका. खुशाल तें पाणी प्या!" मी आधींच तें पाणी भरपूर प्रमाणांत प्यालो होतो. मला केवळ स्वतःची चिंता नव्हती. आमचे जवानदेखील तेंच पाणी पीत होते. उष्ट्या खरकट्यांच्या माझ्या सर्व कल्पना मी त्या पाण्यासवें कोळून प्यालो. गेलीं कित्येक वर्षें प्रवासांत मी माझें अन्न पाणी बरोबर घेतो. बहुधा बाहेरचे खात नाहीं, पाणीहि तोंडांत घेण्याचें टाळतो. पण तें कांहींच येथें शक्य नव्हते. परंतु आरोग्याचे नियम पाळतां येतील, तेवढे पाळले पाहिजेत. एरवीं त्याचें भारी मोल घ्यावें लागते. क्रिमियन युद्धांत इंग्रजांना असें मोल द्यावें लागले. नंतर फ्लॉरेन्स नाइटिंगेलचा उदय झाला. तिनें परोपरीनें सैनीकांची सेवा केली. "Lady with the Lamp" म्हणून ती विख्यात झाली. हातांत दिवा घेऊन ती रात्रीं बेरात्रीं घायाळ सैनिकांची चौकशी करीत हिंडत असे. ब्रिटीश शिपायाला ती एखाद्या



अनुक्रमणिका

देवतेसारखी वाटे. ह्याच क्रिमियन युद्धांत "Charge of the light Brigade" चा प्रकार घडला. वरिष्ठांकडून गफलत झाली. चुकीच्या आज्ञा दिल्या गेल्या, व सहाशे वीर मृत्युमुखांत लोटले गेले. "Into the valley Of death Rode the Six Hundred" असें त्यांच्या आत्मयज्ञाचें टेनिसननें वर्णन केले. म्हणजे चुका इंग्रजांनीं केल्या. पराभव घेतले. डंकर्कचा पराभव. सिंगापूरचा पराभव. नेपोलियनकडून पराभव त्यांनीं पचविले. चुका केल्या पण त्या तांतडीनें सुधारल्या. पराभवाचें रुपांतर विजयांत केलें. आम्हांलाहि तेंच केले पाहिजे.

आम्हीं विचार करीत होतो, व बोलत होतो. बोलतां बोलतां अंधेर पडला. दाट अंधेर पडला तेव्हां रात्र झाली हें मानणें भागच होते. लडाखमधली ही शेवटची रात्र होती. रात्र संपली व दिवस उजाडला. पण अद्याप आकाशांत ढग जसेच्या तसे ठाण मांडून वसले होते. आकाशांत ढगांची इतकी गर्दी असतां विमान-प्रवास कठीण होता. ढग कोणते व डोंगरशिखरें कोणती तेंहि कळत नव्हते. आम्हीं सुस्त होतो. तेंच चहापान, तीच न्याहारी, व त्याच आदि-अंत नसलेल्या गप्पा. सामान आवरण्याचा प्रयास आम्हीं केला नाहीं, आज निघतां येते कीं नाहीं ह्याचीच शाश्वती नव्हती. रहिवास वाढला तर डोंगरावरची लामासराई पाहून टाकावी असा विचार मी करत होतो. ती इच्छा प्रथमपासूनच माझ्या मनांत होती. पण तसा योग नव्हता. लेहमध्यें आणखी एक किंवा अनेक रात्रीहि काढाव्या लागतील, असा रंग दिसत असतांच लेफ्टनंट कर्नल मैत्र घाईघाईनें आले. विमानें सुरू झाल्याची वार्ता त्यांनीं आम्हांला दिली. व सामान बांधायला सांगितले. "Be quick" ते म्हणाले. आम्हीं झपाट्यानें सामान बांधले. सैन्यांचे डगले व गाई गवसण्या परत केल्या आणि विमानतळावर जाऊन पोहोंचलो. तेथें कांहीं वेळ विमानाची वाट पहाण्यांत गेला. नंतर विमान आलें पण विमानांतला शीख बंधु कांहीं केल्या आम्हांला आंत घेईना! मैत्र महाशय रागानें लाल झाले. हातांतले परवान्याचे कागद त्या संचालकाच्या नाकासमोर नाचवीत ते ओरडले, "हे कागद पहा! आमच्याकडून आणखी तुला पाहिजे तरी काय? शेवटीं कष्टानें त्या वाहनांत आम्हांला प्रवेश मिळाला. वायुदलानें शेवटीं भूदलाला सहकार्य दिले. मागें उघडणाऱ्या त्या मालवाहू "पॅकेट" मध्यें आम्हीं जाऊन वसलों. कर्नल मैत्र, माडगुळकर व मी असे तिघें ह्या "पॅकेट"मध्यें होतो. श्री. सवनीस, कानेटकर व देशपांडे ह्यांची व्यवस्था अन्य वायुयानांत झाली. एखाद्या वाणसामानाच्या विकानांत (वा "मशिदबंदर" जवळ) यावा तसा वास त्या वायुयानांत दाटला होता. बोलून चालून मालाची वाहतुक करणारेंच तें विमान होते. आज आम्हीं त्या विमानाच्या वांट्याला आलो होतो. विमानानें ठरीव फेरे घेतले व तें आकाशाच्या दिशेनें झेपावूं लागले. डोंगरांनीं वेढलेल्या खोलगट परातींत वसलेली ती विस्तीर्ण छावणी एखाद्या खेळण्यासारखी दिसूं लागली. लेहची "लामासराय" दिसेनाशी झाली. परिचयाचे झालेले डोंगर मागें पडले. आणि मग रुपेरी डोंगरांच्या शेंकडो शिखरांचा तोच परिचित पट डोळ्यांसमोर उलगडूं लागला. उगीच मौज म्हणून "हुक्या"-सारखा मधूनच आम्हीं नळींतून प्राणवायु "ओढत" होतो व भारताच्या उत्तरसीमेचें तें अविस्मरणीय रुप पहात होतो. खरोखर केवढें भाग्य होते तें! भारताच्या उत्तर टोकाचें दृश्य! भारताच्या दक्षिण टोंकावर सागराच्या लाटा उसळत होत्या. माड डुलत होते. आणि

येथें भूमीलाच पर्वतांच्या लाटा फुटल्या होत्या. तेथें दक्षिणेला पाण्याचा निळा रंग होता, झाडांचा हिरवा रंग होता, कन्याकुमारीला वहुरंगी वाळूच्या पायघड्या पसरलेल्या होत्या. आणि इथें सारी शुभ्रताच शुभ्रता होती! येथें पाणी नव्हते. येथें सौंदर्य केवळ भूमीचें व भूमिपुत्र पर्वतांचे होते; परंतु हेंहि सौंदर्य होते व तेंहि सौंदर्य होते. तेथें रामेश्वर होता येथें श्रीशंकर होता. दोहोंचा आत्मा एक होता, प्राण एक होता. दोन्हीं रुपें ह्या सर्वांगसुंदर, प्राचीन, पुरातन भारताचींच होतीं. खरोखरच किती सुंदर होता हा भारत देश! किती प्रकारची झाडें-झुडपें येथें होतीं, किती प्रकारचे प्राणी, किती प्रकारचे अन्नधान्न व किती प्रकारची वनश्री! किती प्रकारचें वायुमान येथें होतें! व केवढ्या विविध रुपगुणांची माणसें! काश्मिरी होते तसेच वंगाली, पंजावीही येथें होते. आंध्र, तामिळी, राजपूत येथे होते. तसेच मराठे, गुजराती, कानडी, विहारी, माळवी, केरळीय, सिंधी, उत्तरप्रदेशीय व आसामी! येथें नाहीं असा सुगंध नाहीं, येथें नाहीं असा रंग नाहीं, येथें नाहीं असा गुण नाहीं, येथें नाहीं असा धर्म नाहीं. तत्त्वज्ञान नाहीं, शास्त्र नाहीं. कला नाहीं, विचार नाहीं! त्या ह्या वंदनीय देशाचा मी पुत्र! मी येथील रुप गुणांचा वारस! येथील वनसंपदेचें व परंपरेचें रक्षण करणें हें माझें काम! पूर्वजांनीं जें मला दिले ते मी वंशजांचे स्वाधीन केले पाहिजे. ती आसिंधु सिंधु पर्वत व भूमि! तिचा गौरव! तिची परंपरा! त्या भूमीचें तिच्या परंपरेसकट रक्षण करणें हें माझें कर्तव्य होते. तिच्या मानमर्यादा सांभाळणें, तिचा गौरव सांभाळणें हा माझा धर्म होता. आणि भारताच्या ह्या उत्तर सीमेवर तो धर्म आज पुन्हां एकदां इरेस पडला होता. त्या धर्माच्या नांवानें पुन्हां एकदां कर्तव्याचें कृपाण उचलणें भारतास प्राप्त झाले होते. हे हर्षवर्धनाचें व चंद्रगुप्ताचे, विक्रमादित्याचे व पुलकेशीचे, शिवाजीचे व रणजितसिंगाचे विजयी खड्ग होते. शतकांतून कोसळलेल्या आपत्ति ह्या खड्गानें तोलल्या व जिकल्या. ह्या खड्गानें शक जिंकले व हूण, ग्रीक जिंकले व बर्बर, मोंगल जिंकले व तुर्क! साधुसंतांच्या आशीर्वादानें सतेज, अभेद्य व अजिंक्य बनलेलें हें खड्ग होते. दिग्विजयाचें आव्हान देत पीतदैत्याच्या छाया उत्तर सीमेवर पसरत असतां हिमालयाच्या नभांगणांत ह्या कृपाणाची कोर शंकराच्या मस्तकावरील चंद्रकलेप्रमाणें पुन्हां एकदां उदयमान होत होती. दुष्टाचें हनन व सुष्टांचें रक्षण हें ह्या यशोदायी शस्त्राचें कार्य होते. तेंच कार्य ह्या देशांतील देव-देवतांचें होते! जगदंबेचे होते, शंकराचें होते व त्याच्या भक्तांचें होते.

मी शंकराचें स्मरण केले व सरंकन् टेकडीवरील शंकर मंदिर माझ्या डोळ्यांसमोर एखाद्या तार्‍यासारखे चमकले. लडाखचा संस्मरणीय प्रवास संपला. दल सरोवर दिसूं लागलें. श्रीनगर दिसूं लागले. घारीसारख्या घिरट्या घेऊन आकाशयान श्रीनगरच्या विमानतळावर टेंकले, तेव्हां मला घराच्या अंगणांत आल्यासारखें वाटले. पाठोपाठ श्री. देशपांडे, सवनीस व कानेटकरहि आपल्या वायुयानांतून उतरलेले. कर्नल मैत्रांनीं मला पुन्हां एकदां प्रश्न केला, "लडाखविषयीं तुम्हीं काय लिहिणार आहांत, भावे?" त्यांना ह्या पूर्वी दिलेले उत्तर मी पुन्हां एकदां दिले, "लडाखविषयीं व येथील सेनादलाविषयीं निश्चित विधानें करण्याइतपत अधिकार माझेपाशीं नाहीं. येथील कडवे वायुमान मी बर्‍या प्रकारें सहन करूं शकतो हें आपण पाहिलेंच आहे. म्हणून लडाखमधील एखाद्या सेनापथकाच्या सहवासांत कारकून म्हणून, शिक्षक म्हणून, परिचारक, धोबी किंवा साधा बघ्या म्हणून आपण मला वर्ष-सहा महिने राहूं द्यावे अशी विनंति मी आपणांस केली होती. परंतु नियम-निर्बंधांत बसणारी ती गोष्ट नव्हे असे आपण मला सांगितलेत. मी येथें चार दिवसांचा पाहुणा म्हणून आलो व आभारपूर्वक आपला पाहुणचार घेऊन आतां परत जात आहे. जी धांवती चित्रें मी येथें पाहिलीं व जे उडते परिणाम मजवर झाले, त्याचे नियम-निर्बंधांत बसणारें वर्णन करणेंच काय तें मला शक्य आहे. आणि तेंच मी येथें केलें आहे. ●●●












—पद्माकर गोवईकर

# श्रीव. आजचे माऊली



**त्या भिकार(ड्या) वेळीं माझ**
**लग्न लागलं. लग्न म्हटलं**
**कीं मग फोटो आलाच !**
**फोटोग्राफरनें माझा हात**
**सौ. च्या खांद्यावर उचलून**
**ठेवला – मी प्रथमच**
**तिच्याकडे पाहिलं मात्र.... ...**

**कांहीं** वर्षांपूर्वी, स्त्रियांसारखे लिहिणाऱ्या पुरुषांच्या आणि पुरुषांसारखे लिहिणाऱ्या स्त्रियांच्या, एका सभ्य आणि लब्धप्रतिष्ठित मासिकानें 'कहाणींची कहाणी' अशी कांही तरी लेखमाला प्रसिद्ध केली होती. संबंधित लेखकाची विलोभनीय आणि कसदार कादंबरी त्याला कशी स्फुरली (खरं म्हणजे कां स्फुरली. ! ), त्याचे बी-बियाणें कुठलें आणि आपल्या मातींत त्यानें ती किती कष्टानें रुजवली, याची त्या लेखकाकडूनच मागवलेली कहाणी !

मीहि माझ्या 'कादंब्री'ची कथा सांगणार आहे...मात्र ही कादंबरी मी लिहिलेली नाहीं. विधाता नांवाचा सुप्रसिद्ध, ३७ अॅवॉर्ड्स मिळवणारा लेखक आहे. ही 'कादंब्री' मला माझ्या लग्नांत मिळाली...भेट म्हणून नव्हे. एका अर्थी भेटच म्हणायची. चालती बोलती भेट. मला मात्र मुके आणि पांगळे करणारी. अतिशय थोडक्यांत, ही माझी लग्नकथा. गाथा-सप्तपदी. म्हणजे मुळांत लग्न ही माझी कादंबरी. ती कशी घडली याची ही कहाणी. आणि म्हणून, लॉजिकशीं तुमचें गणित जमलें असेल तर तुमच्या लक्षांत येईल कीं, ही कहाणीची कहाणी !

'सांगा' 'सांगा', 'पाठवा पाठवा' असा कुणीहि आग्रह न करतां ती मी सांगत आहे. हा आपला एक माझा नम्र स्वभाव. कशाला कुणाच्या आग्रहाची वाट पाहायची ? आणि आग्रह करायचे दिवस तरी आहे कां ?

काल दुपारीं अडीच वाजतां माझें लग्न लागले. अडीच ही काय लग्न लावायची वेळ आहे कां ? पण आमच्या तीर्थरूपांनी ही भिकार वेळ सुमुहूर्त म्हणून छापली. माझ्या विषयांत तिचा उपयोगहि केला. आज मी थकून गेलो आहे.

तुम्ही फारच हुषार बुवा !

पण नाहीं, थकलोंय् तो लग्नाच्या पहिल्या रात्रीमुळे नव्हे. कलत्र कांही कारणामुळें माहेरींच आहे. आणि दमायला मी कांही या प्रकारात उदयोन्मुख नाहीं...चांगला प्रथितयश आहे. तिरंगी षोक केलेला देह आहे हा. अश्लील मासिकांवर माझें कव्हर कां आलें नाहीं याचें मला अजून आश्चर्य वाटते. सुरळींतल्या खाऱ्या शेंगदाण्यांपासून मंडईंतल्या बासुंदीपर्यंतच्या चवी जिभेवर आहेत. असा 'चव-चाल' मी. तीर्थरूप साखरपुड्याचे रात्रीं म्हणाले सुद्धां—

"पोपट्या, मी तुला चांगला ओळखतो...येत्या फाल्गुनांत मुहूर्त आहे. लग्न करून टाक आणि मग कांहींहि भानगडी कर्र..."

मला न ओळखायला झाले काय ! जन्माला आल्या बरोबर, पहिल्याच महिन्यांत सुईणीला मिठ्या मारणाऱ्या बापाने हें म्हणावे हें योग्यच होतें. ती सुईण पुढें हिस्टेरियानें मेली म्हणे. अर्थात् हें मला माझ्या वेळच्या सुईणीनें सांगितले.. घरच्या मोलकरणीला मुलें झालीं त्या त्या वेळीं आमच्या वडिलांनी पेढे वाटले, हें मी तरी विसरूं शकत नाही. खाणारेहि विसरले नसतील. आणि शिवाय आम्ही जी प्रेम-प्रकरणें केलीं तीं यांच्या अध्यक्षतेखालींच. म्हणजे आम्हीं जी मुलगी प्रेम करायला धरलेली असें तिच्या मातृघराण्याशीं यांचा रियाझ चालू असे. अशा चुडेल बापानें आमच्या साखरपुड्यादिवशीं ही गरळ ओकावी कां ? आम्ही हे सारं बोलली असतो तर मृत्युपत्र लिहिण्याच्या वेळचा चेहरा झाला असता. पण जाऊं दे म्हटलें, बाप आहे आपला. चार लोकांत कशाला बेअब्रु करा. पुन्हां कांहीं ते असं बोलले कीं, मी हे सारं जाहीर करणार आहे. गप्प बसायला मी थोडाच आपला हा ऽऽ आहे !

'प्रियाराधन' इत्यादि थोर गोष्टींशीं माझा पूर्वपरिचय आहे, तरी मुलीच्या बापानेच माझ्या बद्दलचें मत, 'मुलगा प्रलोभनीय आहे या शब्दांत 'सत्यकथे'च्या एखाद्या जुळाऱ्यानें देखील सांगितलें असतें. पण एरवीं बाळबोध वाटणाऱ्या या थेरड्यानें वधूपरीक्षेचा बेत मात्र चमत्कारिक पद्धतीनेंच आंखला. बेत असा होता कीं, मुलीला घेऊन तिच्या घरच्या दोनचार मंडळींनीं आंबेडकर उद्यानांत – (त्यांच्या पुतळ्याशीं) सहज आल्यासारखे बसायचें आणि दोन्ही पक्षांच्या एका वयस्क स्नेह्यांबरोबर मी त्या बाजूनें सहज हवा खात जाण्याचा आव आणायचा, व चलाखीनें भावी कलत्राला पाहून घ्यायचें...

डॉ. आंबेडकरांनीं धर्मांतर कां केले याचें हें एक कारण इतिहास-कारांनीं नमूद करावें. स्वतःची बायको हवा खात पहायला मिळावी यासारखे दुसरें कुठलें दुर्दैव ! (आंबेडकर नवबौद्धच काय, हतबुद्धसुद्धां झाले असते...)

तर्जनी नासिकान्यांत माझा जरी दुसरा क्रमांक लागत असला तरी असल्या चोरट्या परीक्षणाची वेळ यावी ? हलवायानें खव्याला हात लावायचा नाहींतर कुणी लावायचा ! आपल्या बापाबरोबर मुलगी पाहायला जाण्याची पद्धत (अर्थात् मी स्वीकारली नसती) मला हास्यास्पद वाटत असली तरी मनांत मी माझ्या चातुर्यपूर्ण वधुपरीक्षे-बद्दल ऑफ्सेट चित्रें रंगविली होती....?

'पोपची भारत-भेट कशाचें द्योतक आहे ?'

'आंतरराष्ट्रीय शांततेचे..."

"तुम्हीं फारच हुषार बुवा ! आणखी एक. ज्यांचे खाजगी आयुष्य चिखलानें बरबटले आहे, त्यांनी अश्लील-मासिकाच्या खटल्याच्या शेणांत बोटें घालावीत किंवा कसें ?"

"मुळींच घालूं नयेत... "

"वा ! वा ! तुम्हीं न्यायमूर्ति गजेंद्रगडकर कां नाहीं ?"

"कारण मी जयश्री गडकर आहे...."

असे कितीतरी अगदीं वेगळ्या पातळीवरचे सवाल-जबाब मी करायचें ठरविले होते. पण आसपासच्या माणसांनी माझं हें वेगळेपण कधींच आगळेपणाच्या पातळीवर नेलें नाहीं. नेसती वस्त्रं सोडतील पण आपली पातळी ते कधीं सोडणार नाहींत. मलाहि माझी सोडूं देत नाहीत.. पातळी—

प्रत्यक्षांतील माझ्या बायकोचें नांव ठेवायच्या वेळेस हाच फाल्गुन मास. बारश्याच्या वेळी आमचे आम्हीं लहान होतो म्हणून स्वतःचें एक नांव ठेवायची मुभा नव्हती ती नव्हतीच, पण आतां वयांत आल्यावर स्वतःच्या बायकोचें सुद्धां नांव मनाजोगते ठेवतां येऊं नये ? इंडियन् पिनल कोडांत असल्या बापांना शिक्षा ठेवल्या पाहिजेत...

तीर्थरूपांनी माझ्या बायकोचे काय नांव ठेवले असेल असं वाटतं ? मोकळेपणानं सांगा...

सांगूं ?
गो दा बा ला !

टांगलेल्या चक्क्यासारखे नांव वाटतं. त्यांच्या बायकोचं ठेवलं असतं तर गांवभर बोंब मारीत हिंडले असते... (दुसऱ्या बाई समवेत) हांका मारायच्या असल्या नांवानं ? घरांत तीहि बंदी आहे.... या वडिलार्जित आचरटपणाचा मला असा वीट आला आहे...

पण आतां काय उपयोग ? ती मला पसंत पडली. मी तिच्या दिशेनें चालूं लागलो....पण माझ्याबरोबरचे ते दोन्ही पक्षांकडील स्नेही आमच्या स्नेहांतले दिसले नाहींत.... मी जणूं त्यांची बायको पाहयला चाललो असल्यासारखें त्यांनीं मला हटकलें—

"अऽऽऽय्, तिकडे कुठें चाललांत ?"

"आलोच आहे तर ओळख करून घेतो मुलीशीं..." मी चक्क डोळा घालून म्हणालो...

"शहाणे आहांत ! करारांत हें ठरलेलें नाहीं.."



भारत-काश्मिर करारासारखी त्यांनी मला समज दिली. वास्तविक मुलीकडच्या सर्व माणसांनीं आमच्या घरापर्यंत रांगत यावें असे मी म्हटले तरी सर्वांनी तसें यायला हवे. पण त्या थेरड्यानें मला असें कांही हटकलें कीं, ऐकणाराला वाटावें मी बऱ्याच दिवसापासून त्या मुलीच्या पाळतीवर आहे...

"तुम्हीं स्टेशनच्या रस्त्यानें चालूं लागा. मी त्यांना भेटून येतो."

असें म्हणून तो गेला... मी चालूं लागलो.

मी थकलो होतो. शेवटचा उपाय म्हणून मी तिला निवडले होते. अनेक प्रेमभंगांवर उतारा म्हणून मी लग्न करण्याचे ठरवले होते... प्रेम करण्याचे त्राण माझ्यांत राहिले नव्हते म्हणून मला संसार करायचा होता. आणि आजुबाजूची मंडळी नेमका या गोष्टीचा फायदा उचलीत होती. कुणाची तरी डिफिकल्टि ती कुणाची तरी ऑपॉरच्युनिटी होती ना, तसें. मी केवळ दिसायला चांगला नाहीं, आणि माझे प्रेमभंग झालेत– (प्रेमभंग होणें म्हणजे जणु कांही महारोग होणें) या क्षुल्लक सबबीवर माझे छळ चालविले होते....

प्रेमभंग तरी काय, इन-मीन-तीन झाले. पहिलीनें दगा दिला म्हणून दुसरें प्रकरण, आणि दुसरीने हॉस्पिटलमध्यें पाठविले म्हणून केवळ तिचा सूड घ्यायच्या सदिच्छेनें तिसरें प्रेमप्रकरण मी चाळलें. प्रत्येक प्रेमभंग हे आदल्या खेपेच्या त्याच अनुभवाचे भाषांतर असे. सुंदर मुलगी. त्या मानानें कुरुप मी. नंतर वेईमानी, फसवणूक इत्यादि माझ्या पराभूत मनाचा ग्रह. वस्स, इतकेंच. ही तीन प्रेमप्रकरणें आणि तद्भव वदनामी सोडली तर माझ्या इतक्या थोर कुळाचा व सद्वर्तनाचा माणूस मिळणें दुरापास्त ! पण आपण मराठी माणसें (व मराठी मनें) दुसऱ्याच्या कुल-शीलाविरुद्ध जितके एकत्र येतो तितके इत मुद्यांवर एकत्र आलो तर ज्ञानेश्वर–एक कां दोन या समस्या कशाल निर्माण झाल्या असत्या ? आपल्याकडचे विद्वान् जेवढे मूर्ख आहेत तेवढे खुद्द शीख विद्वान् आहेत... (कारण माझें तिसरे प्रेमप्रकरण शीखकन्येचं होतं !)



हें अंमळ विषयांतर..

माझी शेपटी अशी प्रेमभंग आणि कुरुपतेच्या चिमटयांत सांप डलेली. या उलट माझ्या वायकोचें (मला तिला गोदावाला म्हणवत नाहीं.) पूर्वायुष्य माझ्या मॅट्रिकच्या गणिताच्या पेपरसारखें कों करकरीत. हंसतांना दांतांच्या वरच्या–दिसणाऱ्या तिच्या गुलाबं हिरड्या आणि तिचे चोपून नेसलेलें कासोटयाचें लुगडें या दोन गोष्टं वगळल्या तर तिच्याइतकें निरागस सौंदर्य आलम दुनियेंत नाहीं.. आणि खरं सांगायचं तर... तर या दोन्हीं गोष्टींमुळें माझ्या या चिचेच्य फोकेसारख्या सडसडीत दिसणाऱ्या मत्स्यगंधेचं नांव आमच्या वापान 'गोदावाला' असें ठेवले.. काय चित्र डोळ्यापुढें उभे राहते तुम्हीच सांगा. काय नांव अन् काय वाप !

आज संसारसुखाच्या प्रथम (कीं प्रमथ ?) दिवसें मला तिची फार कींव येते आहे... मी दिसायला चांगला नाहीं म्हणून एक्-कता तिघींनी मला झिडकारले, आणि एक्कट–दुक्कट करीत माझ्या गळयाव पाय ठेवून गेल्या. फार कशाला आमच्या तीर्थरूपांनीं एकदां,"पोपटराव एक तुमच्या डोळ्यांतला तिरळेपणा वगळला तर तुम्ही प्रत्यक्ष मदनाचे भ्रतार शोभतां !" अशी वत्तिशी पाजळली होती. तेव्हां ती थोबाडांत नव्हती, नाहीं तर दांतच घशांत घातले असते... तरी खैर, एक मिश सोडून दुसऱ्या कोणत्याच भूषणाचा वारसा त्यांनीं आम्हांला दिलेल नाहीं... त्याहि 'सफाचट' केल्या म्हणजे समजजेल...

पण ती (म्हणजे बायको–मिशा नव्हे) आतां विवाहाच्या पवित्र गाठीनें माझ्याशीं बांधलेली आहे... ती स्वत: दिसायला कशी आहे हे मला अद्याप नीट दिसलेलें नाहीं. कारण आंवेडकर उद्यानांत त्या दिवशी चारी बायका काष्टयाचीं लुगडीं नेसून आल्या होत्या. आणि शिवाय सूर्यास्ताची वेळ होती... आणि लग्न लागल्यावर गळयांत हार घालतांना होमाच्या घूरानें मला कांहींच दिसत नव्हते. प्रथम मी भटजींच्याच गळयांत हार घातला होता. आणि फारच घूर झाल्यामुळें त्यांच्या हातांतील आंतरपाट डोळ्याला लावून मी त्यांच्या आज्ञेशिवाय खाली बसलो होतो... भटजींनीच माझी वाट पाहून शेवटीं तिच्या गळयांत हार घातला होता... तात्पर्य, मला ती अद्याप 'नीट' पाहायची आहे. तरीहि समजा, रतीची भावजय असली, तरी माझे तिरळे डोळे, किंवा माझ्या मिशा तिच्या डोळ्यांत खुपलेल्या मला बिलकुल आवडणार नाहीं. पतिधर्म म्हणून तरी तिनें मला चौसष्ट लक्षणी (यांत ३२ दांत इन्-कल्युड आहेत) पति मानलें पाहिजे. माझ्या जन्मोजन्मींच्या सहवासा-साठीं, तिनें दर पंधरा दिवसांनीं वटसावित्रीची पूजा केली पाहिजे व यमास किलो किलो मस्का लावला पाहिजे...

माझें लग्न रजिस्टर पद्धतीनें व्हावें अशी इच्छा मी माझ्या आणि तिच्या अशा दोन्हीं बापांजवळ बोलून दाखवली. तेव्हां भुंवया कानापर्यंत नेऊन, डोळ्यांत ऑथेल्लो आणून दोघेहि कोरसांत ओरडले होते,

"उचल्या, तूं काय स्वत:ला र. धों. कर्व्यांचा बाप समजतोस काय? (सरळ धोंडोपंत कर्वे म्हटलें असतें तर मला कळले असते ) ब्रास बँड लावून मिरवून आणल्याखेरीज तुला तरी लग्न झाल्यासारखे वाटेल कां?

माझ्या वाटण्या न वाटण्याची ते अशा तऱ्हेनें काळजी व्यक्त करूं लागल्यावर मलाहि त्यांचे निरसन करणें प्राप्त होते...

"मला ॲक्चुअली लग्न नकोच आहे !"

"आँ ऽऽ !"

"मला लग्नाचा नुसता भास हवाय्.."

"अरे कावळ्या, म्हणजे तुझी इच्छा होईल तेव्हां तूं सोडचिठी द्यायला मोकळा..."

"तसं नव्हे...."

"मग कसें ?"

"खर्चाच्या दृष्टीनें...."

"खर्च ! तुझा बाप करणार आहे कां ?" माझ्या सासऱ्यांनी हें वाक्य म्हटलें आणि नंतर त्यांच्या लक्षांत चूक आली. त्याहि झकाझकींत त्यांनीं वडलांकडे पाहून 'Sorry' हं म्हणून क्षमा मागितली. वडिलांनींहि खर्चाचें कन्फरमेशन व्याह्यांकडून होतांच "That's all right" म्हणून उदार अंत:करणानें क्षमा केली. इतकेंच नव्हे तर, खर्च खरोखरीच करणार असाल तर रोज पोपटयाच्या बापाच्या नांवानें बोंब मारा, अशी एक मूक संमतीहि दिली.

फिरून एकी करून दोघे अंगावर आले,

"अरे इराणी घोड्या, खर्च तुझे बाप... सासरे करणार आहेत ना !" सासरे किंचाळत होते.

"तुमच्या काय अटी ठरल्या आहेत मला काय माहित ?" मीहि मिशांनीं शृंगारलेले ओठ कुरवाळीत जोरांत विचारलें.

"मग ऐक !" सासरे शारीरिक लगट करीत म्हणाले,

"खर्च तुझे बाप....आपलं—वडील करणार नाहींत. मी करणार आहे..."

"फर्स्ट क्लास गोष्ट आहे..."

"मग डोमकावळ्या, तुला लग्नाचे भास आणि वाल्मिकी कशाला?"

"ठीक आहे. मग तुम्हीं म्हणतां त्याप्रमाणें मी ॲक्चुअली लग्न करण्यास तयार आहे.... !"

"तुझा बाप तयार होईल..." असें म्हणून वडिलांची क्षमा न मागतां ते जोडे वाजवीत चालते झाले.

"नाहीं. नाहीं ! अहो ऽऽ मीच.... फक्त मीच लग्न करणार आहे." मी नाहींसें होत जाणाऱ्या सासऱ्यांच्या पाठीवर ओरडलो. न जाणो, पडत्या फळाची आज्ञा घेऊन वडील व्हायचेहि लग्नाला तयार.. सासरे निघून गेले. मी मागे वळून पाहिले, आमचे घोडबाप मोठ्या आरशापुढें उभे राहून केसांना कलप चोपडत होते. मी त्यांच्या पाठमोऱ्या आकृतीला अभिवादन केले आणि झोकांड्या खात अंथरूणावर जाऊन पडलो....

माझ्या इच्छेविरुद्ध लग्न वैदिक पद्धतीनें, चांगला डालडाचा होम पेटवून मोठ्या थाटांत झाले. माझ्या तीर्थरूपांच्या कौतुकासाठीं

ब्रास बँड, तिच्या आईच्या पसंतीखातर वाजंत्री-ताशे आणि मित्रांच्या खातर खुद्द हॉलमध्यें मोहम्मद रफी, आणि लताच्या रेकॉर्डस्-माझ्या खातर लग्न असलेमुळे स्वतंत्र कांहीं करणें शक्य नव्हतें. तरीहि एक इच्छा मनांत सुप्त वावरत होती, ती मी मनमोकळेपणानें वडिलांजवळ बोलून दाखवली,

"वैजयंतिमालेचा डान्स झाला असता तर मजा आली असती…"

"छाकट्या–" वडील सभ्य माणसासारखी शिवी देऊन म्हणाले, "स्वतःला तूं बादशहा समजतोस काय ?"

बादशहाचे आणि वैजयंतिमालेचे असे संबंध आहेत हें मला माहित नव्हते.… ते कांहींहि असोत, आपल्या लग्नांत डान्स घालायला तिला काय बादशाहाची परवानगी काढायची होती ? तिच्या दर-दामाचाच प्रश्न होता. तेच वडिलांना द्यायचे नव्हते.

"हुंडा म्हणून मिळालेले माझे सोळा हजार रुपये टाका खाली.." असें म्हणायचें तोंडावर आले होते, पण म्हटले भर मंडपांत, दिवाळीचे पोस्त मागायला आलेल्या गड्यासारखी त्यांची अवस्था करायला नको..

तेवढ्यांत "फोटो…फोटो.." अशा आरोळ्या मंडपांतून उठल्या.

"म्हणजे ?" मी मंडवळ्या कानामागें टाकीत ओरडलो.

"म्हणजे तुमचे फोटो काढायचे…"

"मग मघाशी काढले ते काय गांवांत वाटायला क्काय ?"

"चिडूं नका पोपटराव, मघाशीं क्यामेऱ्यांत फिल्मच घालायला विसरला तो फोटोग्राफर…"



"का SSSSS य ?" मी गुरकावलो.. माझ्या ओरडण्यानें मंडप हादरला. कुणाचे लक्ष नाहीं, असे पाहून चोरून पेढे खाणाऱ्या माझ्या थोरल्या मेव्हण्यांच्या ओठांतला एक पेढा पक्कन् बाहेर पडला.… सासऱ्यांच्या कपाळावरचा चष्मा खालीं घसरला.…

'काय झालं ? काय झालं ?' करीत ते माझ्याजवळ आले.

"सारखे फोटो काढायला मी काय त्रिवेंद्रमचा गोरीला आहे कां?"

"छे, छे.." सासऱ्यांनी बोलायला योजलेला स्वर फार चीड आणणारा होता, "तुम्हीं त्रिवेंद्रमचे गोरीले मुळीच नाहीं… (म्हणजे दुसरे कुठले तरी आहांत हा भावार्थ). कोण म्हणतो रे हे त्रिवेंद्रमचे गोरीले आहेत म्हणून !" त्यांनीं आसपास फिरून सर्वांना विचारलें. कुणीही जाहीर 'हो' कार दिला नाहीं. मीहि त्या आनंदांत फोटोला बसलो.

फोटोग्राफर आला.. कुणींतरी माझ्याशीं ओळख करून दिली.…

"….चांगलें फोटोग्राफर आहेत…!"

"मग यांचेच फोटो काढा ना !" माझा राग कुठंतरी वळवळत होता.… माझ्या या विनोदावर, कपाळावर आठ्यांचे उभे गंध लावून फिरणाऱ्या बायकोच्या मामानें प्रथम तोंड उघडले व ते हंसले. (यानंतर त्यांनीं तोंड उघडले ते जिलब्या हाणायलाच.)

फोटोग्राफरनें लायटिंग सुरू केले. तो शूटिंग करायला आल्यासारखा अेरी फ्लेक्स कॅमेरा घेऊन आला होता. आरडाओरडा होऊन लाईट पडायला अर्घा तास लागला.…

आम्हीं कोचावर एकमेकांना खेटून बसलो. (अजूनपर्यंत मी मुलीला पाहिलें नव्हते.…) आमच्या मधें फार गडबड होऊं नये म्हणून मुलीच्या भाच्याला बसवण्याची कल्पकता केली होती. तें कार्टं दोन दिवस फुकट खायला मिळाल्यामुळें पोटांतील अत्यवस्थेनें सारखे वळवळत होते.… त्याचे लाडूने बरबटलेले हात माझ्या पँटला लागू नयें म्हणून मी चुळबुळत होतों. नेमका त्याच वेळीं फोटोग्राफर ओरडला,

"तुम्हीं डान्स करूं नका… आंत सरका…सरका आंत…." मघाच्या विनोदावर त्यानें सूड घेतला..,

"अहो हा मुलगा फार हलतोय्…." मी कसें तरी बोललो.

"ए SS बब्याSS हलूं नकोस….समोर बघ… काकांच्या मांडीवर कोपर टेकून बैस…" प्रेक्षकांतून कुणींतरी सूचना दिल्या… बब्या भलताच तयार होता. हें सर्व त्यानें आधीच केले होते. शिवाय तो वळवळत होता.

आमची ती पोज् प्रळयकाळापर्यंत टिकवण्यासाठीं फोटोग्राफर जीव कॅमेऱ्यांत घालून पाखडत होता…

"छे: ! छे :, छे :" (याचा अर्थ: तुम्हीं फारच मूर्ख बुवा !) करीत तो माझ्या जवळ आला. माझा उजवा हात त्यानें वळेंच ओढून बायकोच्या खांद्यावर चेपून बसवण्याचा यत्न केला. आणि न्हाव्यापुढं काखा वर करताना हात वर न्यावा तितका उंच हात मला कां न्यावा लागला मला कळले नाहीं…या प्रकारानें मी गोरामोरा झालो…मी प्रथमच डाव्या बाजूला मान वळवून पाहिलें मात्र–

चांडक ब्रदर्सच्या कॅलेंडरची विड्या वळणारी धिप्पाड बाई माझ्या शेजारीं डोंगरासारखी बसली होती. आणि लहानपणीं आईच्या कुशींत झोंपतांना जो वास येई तो तिच्या अंगाला येत होता.

गोदाबाला कुठली, चांगली मुंबई बंदराची गोदी माझ्या शेजारीं बसली होती.

माझे प्रतिथयश, सळसळून आलेले रक्त 'जसें विडीचें जळकें थोटूक' होऊन पडले.

★ ★ ★





अनुक्रमणिका

—वसंत पुरुषोत्तम काळे

# वाघच —
# पण मिस्टर वाघ नव्हे !




**"काळा पैसा शोधलाच पाहिजे" ही आजची पाप्युलर स्लोगन ! पण सर्कशीतल्या वाघाला ती कशी काय कळली बुवा ?**

**झुलत्या** दरवाजाला धक्का देऊन वाघानं ब्रिडिया बँकेच्या ऑफिसांत प्रवेश केला. आंतली एअरकण्डिशण्ड हवा लागताच त्याचं मन प्रसन्न झालं. तो स्वतःशींच पण मोठ्यांदा म्हणाला,

"वा वा, इथं तर गर्द हिरव्या झाडांच्या सावलींत, जाळींत बसल्यासारखं वाटतंय्"—

वाघाचं हे स्वगत त्या शांत हॉलमधे फार मोठ्यांदा वाटलं. अजून बँक इतरांसाठीं उघडायची होती. जो तो गडबडीत होता. तरीहि वाघाचं हे स्वगत बहुतेकांनी ऐकलं. पहिल्यांदा वाघाकडे लक्ष गेलं ते दरवाजाजवळ बसलेल्या हवालदाराचं ! खऱ्याखुऱ्या, जिवन्त, साडेआठ नऊ फूट लांबीचा तो वाघ पहाताच हवालदार स्टुलावरून मागच्या मागं कोसळला. सगळ्यांच्या नजरा त्या बाजूला वळल्या आणि तिथंच खिळल्या !—पार थिजल्या !!

—किंकाळी फोडण्याचं भानहि कुणाला राहिलं नाहीं. आपल्या आगमनानं केवढा हाहाःकार उडाला त्याचं वाघाला कौतुक नव्हतं. हवालदाराचं रिकामं झालेलं स्टूल पुढच्या पायानं त्यानं सारखं केलं. आणि मागचे दोन पाय दुमडून मोठ्या शर्थीनं तो तोल सांवरीत त्या स्टुलावर बसला.

एवढा अवधि बँकेतल्या इतर लोकांना पुरला. हां हां म्हणता, करंट, इन्क्वायरी, सेव्हिंग्ज ह्या खिडक्या ओस पडल्या. एकमेकांचे हात घट्ट पकडीत सगळेजण स्टोअर्सकडे धावले. शांत, तटस्थ होते ते फक्त पेअींग कॅशियर आणि रिसिव्हिंग कॅशियर ! ते इतरांची ही धावपळ मजेनं पहात बसले. त्यांना भिण्याचं कारणच नव्हतं. त्या दोघांच्या भोवती बळकट जाळीचा पिंजराच होता ना ?- तेवढ्यांतला तेवढ्यांत प्रसंगावधान राखून सौ. प्रतिभा वाघ, बिलीमोरियाच्या पिंजऱ्यांत गेल्या.

—एव्हांना वाघ स्टुलावर व्यवस्थित बसूं शकला होता. वास्तविक आतां टाळ्यांचा कडकडाट व्हायला हवा. त्याखेरीज स्टुलावरून उतरायचं कसं ? —हा तर नेहमीचा कार्यक्रम! ग्रेट इण्डिया सर्कसमधे दिवसांतून तीन वेळां स्टुलावर बसून दाखवायचं ! —प्रो. भवानराव आणि वाघ ह्यांची रोजची जुगलबंदी !— फटके खायचे, 'शौक' सहन करायचे, गुरगुरत, गुरगुरत शेवटीं स्टुलावर नाइलाजानं बसायचं. प्रेक्षकांकडून टाळी ऐकली की उतरायचं !

— पण आज न सांगता स्टुलावर बसून दाखवलं तरी टाळी नाही हे कसं ?—वास्तविक जातिवंत वाघाला असं एखाद्या पट्टेवाल्या-सारखं स्टुलावर बसायला लावायचं हे अपमानास्पद !— अरे, अंगावर "पट्टे" असले म्हणून काय — जंगलच्या "शेरानं" असं "पट्टेवाला" व्हायचं ?—पण ही व्यथा प्रो. भवानरावाला समजली नाहीं—



अनुक्रमणिका

– वाघ स्वत:च्या विचारांत चूर होता आणि तिकडे मात्र एकमेकांना मिठया मारून सर्व चुपचाप उभे होते. पेईंग आणि रिसिव्हींग कॅशियर्सना – विलीमोरिया आणि सातपुते ह्या दोघांना एरव्ही सगळे कैदी, कैदी म्हणून चिडवत. पण आता ते कैदी कॅशसकट सुरक्षित होते. त्याशिवाय बिलीमोरियाच्या पिंजऱ्यांत सौ. वाघसुद्धां ! –

बिलीमोरिया सौ. वाघांना हळूच म्हणतो,

'मिसेस् वाघ, तुमी साला समद्या स्टाफ्‌वर लई गुरगुरते, पण आतां मिस्टरला सो मच् घाबरते ? साला वंडर हाय.'

'मग काय त्याला मिटी मारू ?'– आपण नक्की 'सेफ' आहोत ह्याची खात्री पटल्यावर सौ. वाघांनी बिलीमोरियाचा जोक परतवला.

'तुमी हा ॲडव्हेन्चर करेल, तो ड्रॉवरमंदी हाय ते कॅश तुमची !'

'हो, हलवायाच्या घरावर तुळशीपत्र.'

– स्वतंत्र खोलीत बसलेल्या एजंट, माधव निगुडकरला बाहेरच्या ह्या कोलाहलाची कांहीं कल्पनाच नव्हती. त्यांनी आंतून फोन उचलला. थरथरत्या हातानं तो फोन गोखल्यांनी उचलला. कापऱ्या आवाजांत ते बोलायला लागले –

'स ऽऽ र, सऽऽर, सर....'

'येस्, व्हॉट इज दॅट ?'

'स....र, सऽऽर, वाघ...वाघ ..'

'हो हो, येणारच होते. त्यांना पाठवून दे'.

'सर....प ....ण...'

'पण काय ? – मिसेस् वाघ आहेत ना आपल्या ब्रँचमध्यें ? त्यांचे मिस्टर आहेत ते...'

'अशक्य....' अनावधनानं गोखले ओरडले. आंतून निगुडकर दुप्पट मोठ्यांदा ओरडले,

'नॉन्सेन्स्.' – पलीकडचा फोन आपटला गेला. गोखल्यांनीं फोन खाली ठेवतांच सातपुते म्हणाले, 'काय म्हणताहेत साहेब ?'

सौ. वाघांकडे पहात गोखले म्हणाले, 'मिस्टर वाघांना आंत पाठवून द्या म्हणताहेत'.

– तशाहि परिस्थितींत सगळे हंसले. आणि तेवढ्यांत केबिनचं दार उघडून माधवराव निगुडकर बाहेर आले. त्यांच्या नवीन टेरिलीनच्या सुटाकडे आज कुणाचंहि लक्ष गेलं नाहीं.

'व्हेर इज् मिस्टर वाघ ?' ते मोठ्यांदा म्हणाले. पहातात तो सगळे असिस्टंट्स् दरवाज्यामागं लपलेले आणि सौ. वाघ रिसिव्हिंग कॅशियरच्या पिंजऱ्यांत ! –

'अरे हा काय नॉन्सेन्स चाललाय् ?– आत्ता बँकेत लोक यायला लागतील. तुम्ही काय लपंडाव खेळताय ?'

–निगुडकरांचा आवाज सर्वत्र घुमला. टाळ्या पडण्याची वाट पाहून वाघ कंटाळला. आपल्यासारखंच कोण गुरगुरतंय् हे पहाण्यासाठी त्यानं स्टुलावरून उडी मारली. काउण्टवर पुढचे दोन पाय टेकवून उभं रहात तो कांचेतून पलीकडे पहायला लागला.

– निगुडकरांचं तिकडे लक्ष गेलं आणि एअरकण्डिशण्ड वातावरणांत त्यांना घाम टला. विजेच्या वेगानं ते आपल्या खोलीकडे धांवले. पाठोपाठ इतर मंडळी धावली. आंत गेल्यावर निगुडकर आधी ग्लासभर पाणी प्यायले. आणि मग, 'वाघांना आंत पाठवून द्या' सांगितल्याचं त्यांना आठवलं. तशा परिस्थितींत ते हंसले. साहेब हंसल्यावर सगळेच मोकळे झाले.

'सर, 'पोलिसला फोन करा.'

निगुडकरांनी फोन फिरवायला सुरवात केली.

हॉलमध्ये शांतता झाल्यावर वाघानं इकडे तकडे पाहिलं. तेवढ्यांतच त्याला समोर पिंजरा दिसला. वाघानं लगेच तिकडे मोहरा वळवला. तिथंहि त्यानं काउण्टरवर पुढचे पाय टेकवले. पिंजऱ्यात त्याला विलीमोरिया व सौ. वाघ दिसल्या. आपण बाहेर व माणसं पिंजऱ्यात, हा उलटा प्रकार पाहून वाघ चक्क हंसायला लागला. विलीमोरिया, सौ. वाघ आणि सातपुते डोळे विस्फारून तो प्रकार पहात राहिले. तेवढ्यांत वाघ म्हणाला,

'खूप दिवसाचं स्वप्न साकार झालं म्हणून हसलो.'

'स्वप्न ?' – सौ. वाघांनी चमकुन् विचारलं

'मग काय ? – झोपेचा आणि स्वप्नांचा मक्ता काय फक्त माणसांनीं घेतलाय् ?'

'लेट इट गो रे. साला ड्रीम तो सांग.'

वाघ मिशावरून पंजा फिरवीत म्हणाला,

'मी बाहेर आणि माणसं पिंजऱ्यांत आहेत असा मजा पहायचा होता एकदा. असो. मंडळी, तुम्ही कोणत्या सर्कसमधें कामं करता ?'–

विलीमोरियाला मजा वाटून तो म्हणाला,

'आमची सर्कस, ब्रिडिया बँक.'

'वा वा, वहोत ख़ूब ! – आत्ता आरडाओरडा करून खोलीत गेले ते रिंगमास्टर वाटतं ?'

'हो, करेक्ट.' – सौ. वाघ म्हणाल्या. सौ. वाघांकडे पाहत वाघानं विलीमोरियाला विचारलं,

'इनकी तारीफ ?'

'ह्या सौ. वाघ.' सातपुते म्हणाले.

–सौ. वाघ म्हणताच – वाघ फटकन् लाजला. थोडा घाबरलाहि.

'अरे, तुमी वाईफ्‌ला डरते ?'

वाघ म्हणाला,

'मिसेस् वाघ म्हटल्यावर मला बायकोची आठवण झाली व घाबरलो मी. बायको, म्हटलं म्हणजे वाघ काय, माणूस काय, सगळेच भितात.'

'असं ?'

'मग खोटं की काय ?– आता आमचा रिंगमास्टर,

'प्रो. भवानराव. . . . . '

'प्रोफेसर भवानराव ?' मधेच सातपुत्यांनी विचारलं.

'प्रोफेसर नाहीं; प्रोप्रायटर ! – हां तर तो भवानराव एका वेळेला आठ आठ, दहा दहा वाघसिंहाबरोबर काम करतो. पण बायकोसमोर....? विचारूच नका. बायकोशी भांडला की माझ्या पिंजऱ्यांत येऊन लपतो. बायको मग बाहेरून म्हणते,

'डरपोक कुठले. वाघाच्या पिंजऱ्यांत लपतात. हिंमत असेल पर बाहेर या.'

'अय्या, ही तर जोक आहे. मी वाचली होती.'

'मिसेस् वाघ, ही जोक नाही. रोज असं घडतं.'

– सगळे ह्यावर मनमुराद हंसले. त्यांच्या हास्यविनोदाचा आवाज ऐकून मधाशी बेशुद्ध

पडलेला हवालदार हळू हळू शुद्धीवर आला. किलकिल्या नजरेनें त्यानं सगळीकडे पाहिलं. पहातो तो विलीमोरिया, सातपुते आणि वाघवाई, दोस्ताशीं बोलावं त्याप्रमाणं वाघाशीं बोलताहेत. त्याच क्षणीं हवालदाराला परत एकवार जाणीव झाली की धोका आपल्यालाच आहे. त्या तिघांना नाहीं. पाय न वाजवता तो मग दरवाजाकडे सरकला. सावधानतेनं त्यानं दरवाजा उघडला आणि बाहेर येत तो मागच्या मागं लावूनहि टाकला. तिथूनहि पळण्याचा त्याचा विचार होता, पण तेवढ्यांत प्रो. देशपांडे समोरून आले. त्यांची बँकेत रोजची फेरी ठरलेली! – हवालदारानं त्यांना तिथंच आडवलं. दरवाजा किल्किला करून आतलं दृश्य दाखवलं. प्रो. देशपांडे तिथंच थांबले.

बाहेर हळू हळू गर्दी वाढत होती आणि आंत त्या चौघांच्या गप्पा रंगल्या होत्या.

☆ ☆ ☆

'तुम्ही पण सकाळचे इकडे कसे ?'

'पेपर वाचल्यामुळें आलो.' वाघ शांतपणें म्हणाला.

'तुम्ही वाचता ?' – सौ. वाघांनी विचारलं.

'आमचा पिंजरा साफ करायला गणपत नांवाचा गडी ठेवलाय् तो त्याच्या दोस्ताला रोज पेपर वाचून दाखवतो. तेव्हां आम्हीहि बातम्या ऐकतो त्यांतल्या. आजची बातमी ऐकली आणि संधी मिळताच पळून आलो.'

'असं काय विशेष आलंय आज ?'

'पोलीसांनी छापे घालून काळे पैसे उजेडांत आणले. असे छापे आता सगळीकडे घालणार आहेत. बँकेतल्या लॉकर्सना पण सिलं बसणार आहेत.' वाघ तावातावानं सांगायला लागला

'अरे पण, तुमी जानवर लोक कशापायी बॉदर करते ?'

– विलीमोरियानं विचारलं. एकदम् चिडून, तिथल्या काउण्टरवर पंजा आपटीत वाघ म्हणाला,

'तेच सांगतो आतां. आम्ही जनावरं माणसांच्या भानगडीत कधींच पडत नाहीं. जनावरांनी इंटरेस्ट घ्यावं असा जनावरांचा एकहि गुण माणसांत नाहीं. ज्या जनावरांनी माणसांसाठीं जन्मभर रक्त आटवलं त्यांना माणसं कशी वागवतात ते मी ऐकलंय्.'

'शांत व्हा, शांत व्हा. सांगा तरी आम्ही काय करतो ते !' –

'वाचा की पेपर. परवांच एका जातिवंत, उमद्या घोड्याला तुम्ही माणसांनी गोळी घालून मारून टाकलंत्. बिचारा तुमच्यासाठीं छाती फुटेपर्यंत पळत होता. जनावरांच्या जीवावर तुम्ही गाड्या उडवता आणि वेळ आली की जनावरालाच उडवता ! माणसां- पेक्षा घोडे चांगले. ते नाहीं माणसांवर पैसे लावीत !'

– विलीमोरिया, सौ. वाघ आणि सातपुते तिघंहि हंसली. सातपुते म्हणाले,

'खरं आहे. पण आज तुम्ही इकडे येणं कसं काय केलं ?'

'अशीच एक बातमी समजली, माणसांच्या कारस्थानाची. म्हणून आलो. वास्तविक तुम्ही माणसांनी रोज जनावरांची पूजा करायला हवी. पण तें कुठलं व्हायला ! – तुमच्या बरोबर जे इमानानं रहातात त्यांच्यावर तुम्ही उलटता.'

'कसं काय ?'

'एखादा इमानी कुत्रा पिसाळला तर काय करता तुम्ही ? – त्याला गोळी घालता ना?'

'अहो पण, त्याच्यापासून धोका....'

'आणि पिसाळलेल्या माणसांपासून नसतो धोका ? त्यांना कां नाहीं गोळी घालत ? – तुमची चाकरी करून करून होतो जनावराच्या डोक्यावर परिणाम. एक प्रकारचं दुखणं तें ! – अशाच वेळी जनावराला संभाळलं पाहिजे, पण तुम्ही घालता गोळी ! – माणसांच्या सहवासांत राहून जनावरांना माणसांच्या व्याधी जडूं लागल्या आहेत.'

'अय्या, त्या कशा ?'

'पेपर वाचा ! – परवा राणीच्या बागेंतल्या वाघाचा दांत उपटावा लागला. आतांपर्यन्त हे दाताचं दुखणं वाघाला झालेलं कधी ऐकीवात होतं ? पण असंच व्हायचं हे. जंगलांतला निसर्गाचा सहवास सोडून आम्ही माणसात आलो ना ?'

'अरे, तुमी तो साला लई आश्चुटस्पोकन हाय. आज कशापायीं आला तेची वार्ता कर ना.'

'त्या प्रो. भवानरावानं इथं, ह्या बँकेत माझ्या नावांवर अकाउण्ट उघडलाय आणि काही लॉकर्स घेतलेत. त्या लॉकर्समधे काय काय दडपून ठेवलंय ते मला बघायचंय.'

– ह्या बातमीनं तिघंहि दचकली. त्यांच्या चेहऱ्यावरचे हावभाव पहात वाघ म्हणाला,

'म्हणजे मी ऐकलं ते खरं तर ! – ठीक. समजली माणसांची जात ? स्वत: वाईट धंदे करतात, आणि आम्हां जनावरांची नांवं बदनाम करतात. स्वत:च्या हिंमतीवर पापं कां नाहीं करत ? – दिवसांतून तीनदां माझ्या जबड्यांत मान देऊन, लोकांकडून टाळ्या मिळवतो तो भवानराव. अवकाश काय तो








जवडा मिटण्याचाच असतो. मी सहज काटा काढूं शकेन. हजारों लोकांना साक्ष ठेवून ! – पण नाही जमणार. आपल्या जवड्यांत मान दिली तरी आपण वार करणार नाहीं. पण भवानरावानं मात्र माझी मान कापली. माझ्या नांवावर लॉकर्स घेऊन दगलबाजी केली. मला आतां तुम्ही मदत करा. मला लॉकर्सची चावी द्या. काळा पैसा बाहेर काढून मला देशाला मदत करायची आहे. देशानं माझा मान ठेवलाय्. मला देशाचा मान ठेवूं दे.'

'देशानं तुमचा मान ठेवला ?– कसा काय?' सातपुत्यानीं विचारलं.

'चोवीस तास पैशाच्या व्यवहारांत राहूनहि तुम्ही त्या नाण्यांकडे नीट पाहिलंत पण नाहीं? नवल आहे. त्या नाण्यांवर माझं चित्र छापलंय्. केवढा बहुमान आहे माझा ! वाघासारखं जनावर, अंधारांत काय किंवा पिंजऱ्यात काय, कधींहि जखडून रहायचं नाहीं. संधी मिळतांच ते बाहेर निसटणार. उघड्यावर येणार; म्हणून नाण्यावर माझं चित्र छापलंय्. कळलं ?– आता मला किल्ल्या द्या.'

–बोलता बोलता काचेखालून पंजा घालून बिलीमोरियासमोरचा किल्यांचा जुडगा हस्तगत (कीं पंजागत ?) केला. त्याचवेळीं बाहेरचा दरवाजा उघडला गेला. हातांत छड्या घेऊन प्रो. भवानरावांनी प्रवेश केला. बाहेर गाडीवर टाकलेला पिंजरा सज्ज होता. पिंजऱ्याच्या वर सरकता दरवाजा वर उचलून गडी तयार होता. प्रो. भवानरावाच्या पहिल्या इशाऱ्यासरशी वाघ पिंजऱ्यांत जाऊन बसला. दरवाजा मिटला.

बाहेरच्या हॉलमध्ये सगळे जमले. हास्यकल्लोळांना ऊत आला. प्रसंगावधान दाखवल्याबद्दल प्रो. भवानरावांनीं निगुटकरांचं अभिनंदन केलं, आणि शेवटीं विचारलं,

'काय हो निगुडरकर, पिंजऱ्यांतून निसटलेला वाघ, सरळ बँकेत कसा आला ?'–

– निगुडकर काय सांगणार ?–ह्या प्रश्नाचं उत्तर एवढ्यांत, सातपुते, बिलीमोरिया आणि सौ. वाघ ह्यांना समजलं होतं. पण समोरच पोलिस ऑफिसर्स हजर होते. त्यांच्यासमोर काय बोलायचं ?–

–तेवढ्यांत, बिलीमोरिया ओरडला,

'अरे साला, त्या टायगरनं आमचा की-वंचू नेलाय् लॉकर्सचा...गेट इट्, गेट इट्...!' ●●●

# रिकामा (न्हावी नव्हे!) प्राध्यापक



**एक** म्हातारा होता, त्याचा मुलगा होता पण दोघांचा बैल नव्हता; कसले तरी दुकान होते. हा म्हातारा महाबेरकी होता. त्याचा एक भागीदारही होता. एक दिवस एक गिऱ्हाईक आपले पैशाचें पाकीट दुकानांत विसरले. मुलगा म्हणाला, "बाबा, या पैशाच्या पाकिटाचें काय करायचे?" तेव्हां तो विलंदर दुकानदार उद्गारला, "मुला, हा काय प्रश्न झाला? उघड आहे, पाकीट आपले. आतां आपल्या भागीदाराला या पाकिटांत भागीदार करावयाचे कीं करायचे नाहीं हा प्रश्न व्यावसायिक नीतीच्या दृष्टीनें महागहन आहे."

व्यावसायिक नीतीच्या दृष्टीनें आमुच्या स्वहिताच्या धंद्यासंबंधीं प्रांजळपणें चार शब्द लिहावेत कीं लिहूं नयेत याचा उलगडा अजून तरी झालेला नाहीं. माझा धंदा आहे कॉलेजांत शिकविण्याचा. एके काळीं लोकांना प्रोफेसर या प्राण्याबद्दल विलक्षण आकर्षण आणि आदर वाटे. जादुगार, सर्कसवाले, न्हावी, गाणारे, वाजविणारे, स्वयंपाकी आपल्या नांवामागें प्रो. इतकेंच लावीत म्हटले तर प्रोफेसर नाहीं तर प्रोप्रायटर आहेच. स्वराज्य मिळाल्यानंतर कॉलेजें गवतासारखी उदंड वाढल्यामुळें सध्यां तर तोंडल्याचे येते तसें प्रोफेसरांचें सर्वत्र खुळे पीक आलें आहे (खुळा हा शब्द येथे संख्यावाचक आहे, गुणवाचक नाहीं!) त्यामुळें आतां न्हावी सुद्धां प्रोफेसरकीचें शेपूट लावीत नाहीं. हे स्पष्ट बोलणे म्हणजे व्यावसायिक नीतीच्या दृष्टीनें गुन्हा आहे. आपल्या भानगडी आणि आपला कमीपणा ज्या गोष्टीमुळें खपवतां येतो आणि लपवतां येतो त्याला व्यावसायिक नीति म्हणतात. पण या व्यावसायिक नीतीचा अधिक्षेप करून मी खरें बोलणार आहे. आणि आमच्या धंद्यांतील चार खारट तुरट गोष्टी कसलाहि मालमसाला न लावतां आपल्यापुढें सांगणार आहे.

आतां वर आलेल्या न्हावीबुवावरून आठवले तें प्रथम सांगतो. रिकामा न्हावी हा शब्दप्रयोग जो आहे त्यांतील रिकामा हा शब्द न्हाव्यापेक्षां आम्हां कॉलेजपदस्थ प्राध्यापकांनाच अधिक फिट्ट बसतो. उत्तर ध्रुवावर जसा सहा महिने सूर्य असतो तसा कॉलेजांत सहा महिने ज्ञानसूर्य तळपत असतो. आणि उरलेले सहा महिने पार काळोख! कारण तीन महिने उन्हाळयाची, एक महिना दिवाळीची, अर्धा महिना नाताळाची आणि वगैरे, वगैरे मिळून आम्ही सहा महिने गांवभर उंडारत असतो. भरपगारी पण पेन्शनराचे संपूर्ण रिकामपण देणारी आणि त्याबरोबर परावलंबीपणाला थारा न देणारी नोकरी म्हणजे प्रोफेसरची नोकरी. भाजीत भाजी मेथीची त्याप्रमाणें नोकरींत नोकरी कॉलेजमधील प्राध्यापकाची असें आमच्या ज्येष्ठ व्यावसायिकाचें मत आहे.

डॉ. मनोहर मा. आळतेकर

आम्ही सहा महिने स्वस्थ बसत नाहीं. स्वस्थ बसलो असतो तर इतरांच्या डोळयांवर ते आले नसते. आम्ही सहा महिने जे पेरतो त्याचे पीक या सुट्टीच्या सहा महिन्यांत नसले तरी चार महिन्यांत कधीं राखणदार म्हणून तर कधीं उत्तरपत्रिका तपासनीस म्हणून भरपूर काढतो. याचा राग अनेक सज्जनांना येतो. येणारच. कारण ढगाशिवाय पाऊस नाहीं आणि मत्सराशिवाय माणूस नाहीं!

लोकांच्या पोटदुखीस कारण होणारे आमचें रिकामपण वाटते तितके सुखकारक मात्र नसते. विशेषतः शिकलेल्या व मिळवत्या बायकोच्या जमान्यांत भीक नको पण कुत्रा आवर अशी अनुकंपनीय अवस्था होते. एक वेळ शिकलेली व मिळवती बायको परवडली पण कधीं कधीं आर्य स्त्री म्हणून गौरविण्यांत येणारा अडाणी गोळा राहू केतू प्रमाणें नवऱ्याला अक्षरशः गिळायला निघतो. आमच्या कॉलेजांत एक वडीलधारे प्राध्यापक आहेत. बघावे तेव्हां त्यांचा मुक्काम आपला कॉलेजमध्यें! कॉलेजमध्यें केव्हां येतात आणि कॉलेजमधून केव्हां जातात हे कॉलेज झाडणाऱ्या गडयांना आणि कॉलेजांत राहणाऱ्या आमच्या प्रिन्सिपॉलसाहेबांनाच ठाऊक! यामुळें कॉलेजचे कामसू आणि एकनिष्ठ सेवक म्हणून या प्राध्यापकांना भलताच भाव होता. यांचे नांव निघाले कीं, आमचे प्रिन्सिपॉल सद्गदित होत. निवृत्त होण्यास दोन तीन वर्षे उरली तेव्हांपासून यापुढें आपला आणि कॉलेजचा कायमचा विरह होणार या कल्पनेमुळें बहुधा, तसेच आर्थिक विवंचनेमुळें लाल भोपळयाप्रमाणें गरगरीत व गोल असणारा प्राध्यापक मजकुरांचा चेहरा पडवळाप्रमाणें लंबायमान होऊं लागला एक दिवस तर ते फारच चिंतातुर दिसल्यामुळें आम्ही त्यांचे सांत्वन करूं लागलो तेव्हां तो महापुरुष हताश आवाजांत म्हणाला. "माझी बायको भयंकर भांडखोर आणि



अनुक्रमणिका

कांगावखोर आहे. यामुळें सकाळपासून ते संध्याकाळपर्यंत आज चाळीस वर्षे आमचा मुक्काम कॉलेजमध्येंच असतो. साधी रविवारची सुट्टी आली तरी पोटांत भीतीचा गोळा उभा राहतो. आतां निवृत्त झाल्यावर सगळा वेळ घरांत काढावा लागणार आणि बायको तर–" प्राध्यापकांना पुढें बोलवेना आणि आम्हांला त्यांच्या भकास चेहेऱ्याकडे बघवेना.

मुंबई विद्यापीठाचे अधिकारी विरुद्ध नसतील इतके आमचे प्राध्यापक मित्र बंडोपंत वडवडे हे सकाळच्या कॉलेजचे शत्रू आहेत. पण त्याची कारणें शैक्षणिक नाहींत! कौटुंबिक आणि परिवारात्मक आहेत. सौभाग्यवती वडवडे कुठल्यातरी हपिसांत दहा वाजतां निघून जातात. मुलांची शाळा रोज सकाळचीच असते त्यामुळें मुलें घरीं आल्यावर त्यांना सक्तीनें भरवणें, गडयानें भांडीं घासल्यावर ती विसळणें, डाळ तांदूळ वगैरे निवडणें, संध्याकाळकरतां भाजी चिरून किंवा निवडून ठेवणें, मुलांना दुपारचे खाणें देणें, त्यांच्याकडून अभ्यासाची लेव्ही वसूल करणें, केर काढणें, अंथरुणें घालणें आणि अर्धांगी दमून भागून घरीं आल्यावर तिला चहा करून देणें आणि त्या समयीं कचेरीतील तिच्या गप्पा ऐकणें ही सर्व कर्मे बंडोपंत विनातक्रार पार पाडतात. उलट बोलावें तर पंचाईत! कारण बायको शिकलेली, मिळवती इतकेंच नव्हे तर चार पैसे अधिक मिळविणारी. कोणी प्राध्यापकाचे रिकामपण काढलें कीं, बंडोपंत वडबडे रागानें हिरवे निळे होतात. डोळे खदिरांगारासारखे कीं, काय म्हणतात, तसें लाल करतात आणि बोलणाऱ्याच्या अंगावर धांवून जातात !!

आमचे रिकामपण कॉलेजांतसुद्धां डोळयावर येते. रोजचे असतील ते दोन तीन तास घेतले कीं, आम्ही आमच्या खुंटावरून पळून जात असूं. आमच्या प्राचार्यांना आणि विज्ञान विभागांतील आमचा हेवा करणाऱ्या सहकाऱ्यांना ही गोष्ट बघवली नाहीं. तेव्हां चार तास कॉलेजमध्यें बसलेच पाहिजे असा स्थानबद्ध करणारा हुकूम निघाला. आमचें कामच असें आहे कीं, आठवडयांत किमान एक दिवस पुरा रिकामा मिळतो. पण रिकामा मिळून उपयोग काय ? आम्ही रिकामे तसाच आमचा खिसाही रिकामा असतो. आमच्यांकडे दांत असतात पण चणे नसतात. यामुळें दहा तारखेच्या पुढें साधे दादरहून बोरिवलीला जरी जावयाचे असले तरी दामाजीपंत बरोबर नसल्यामुळें विनोबांची पदयात्राच करावी लागते. या गोष्टीची विदारक कीं काय म्हणतात ती जाणीव असल्यानें आमच्या एका व्यवसायबंधूनीं पायपिटी करण्याची म्हणजे हायकिंगची एक संस्थाच स्थापन केली. पण असे पायपिट प्राध्यापक एकंदरीत कमीच! बहुतेक प्राध्यापक बैठे असतात. वेळ जावा आणि वर मान मिळावा म्हणून कुठल्याही सभेला अध्यक्ष म्हणून तर कधीं वक्ते म्हणून हे प्राध्यापक हजर असतात! रिकामपण माणसाला काय करायला लावील सांगता येत नाहीं. आमच्या शेजारच्या कॉलेजचे चिंतोपंत चिवटे हे तर कोण केव्हां मरतो आणि आपण भाषण करतो याची वाटच बघत असतात! एकवेळ दुखवटयाची सभा माणूस न मरतां होईल पण चिंतोपंतांच्याशिवाय होणें अशक्य!

कांहीं प्राध्यापक एकत्र जमतात आणि खावयास येणाऱ्या रिकामपणाचा फडशा पाडण्यासाठीं ब्रिजपासून रमीपर्यंत आणि रमीपासून तीन पानीपर्यंत पत्त्यांचे डाव सुरू करतात. एक एकांडे आणि स्वावलंबी शिक्षक तर खिशांत पत्त्याचा जोड ठेवतात आणि वर्गांतहि मुलांना निबंध किंवा प्रश्न लिहावयास दिला कीं, चक्क पुढील टेबलावर पानें मांडून पेशन्सचा डाव सुरू करतात! हा उपक्रम एके वर्षी विद्यार्थ्यांना इतका पसंत पडला कीं याच नव्हे तर इतर प्राध्यापकांच्या तासाला ते शिकवत असतांना मुलें बाकावर पत्त्यांचा क्रम जुळवीत असायची. एरव्हीं भुतासारखी आरडा ओरड आणि दंगा करणारीं मुलें सुतासारखी सरळ आणि सालस झालेली पाहून आमचे प्राचार्य प्रसन्न झाले. पण एकदां वर्गावरून जातांना पत्त्यांचा अळीमिळी गुपचिळीचा प्रकार पाहिल्यावर त्यांचा धीर सुटला आणि आमच्या पत्तेपंडित प्राध्यापकांची नोकरी पण सुटली.

पण कांहीं प्राध्यापक, विशेषत: देशाची फाळणी झाल्यावर निर्वासित म्हणून आलेले प्राध्यापक आपल्या रिकामपणाचे रुपयांत रुपांतर करण्यांत प्रवीण आहेत. एक रसायनशास्त्राचा प्राध्यापक टॅक्सी चालवतो तर गणिताचा प्राध्यापक सलून चालवितो, तिसऱ्यानें परटाचें दुकान काढले आहे तर इंग्रजीचे प्राध्यापक आमच्या दादर चौपाटीला गरम पकोडे विकत असतात.

आमचे निरुद्योगी उद्योग कॉलेजमधील अधिकारी वर्गाला म्हणजेच चारपांच दादा लोकांना बघवत नाहींत. मग आमच्यामागें अनेक अभ्यासेतर उद्योग लावण्यांत येतात. आमचा एक गणित विषय शिकविणारा प्राध्यापक मित्र विद्यार्थ्यांना मांफक दरांत देण्यांत येणाऱ्या दुधाचे हिशेब ठेवतो, रोज पैसे वसूल करतो, ते करतांना चुका करतो आणि महिन्याच्या शेवटीं आपल्याच खिशांतले

**हृदयीं धरा हा बोध खरा**



इकडे झाडांवर पाणी घाला, आकाशांत बाग नाहीं....!

पांच दहा रुपये भूर्दंड भरतो. त्याच्या उद्योगाचे हें व्यस्त गणित आज अनेक वर्षें चालू आहे.

आमच्या कॉलेजचें उपहारगृह दुसऱ्या प्राध्यापक मित्राच्या गळ्यांत बांधलेले आहे. केवळ एम्. ए. मध्यें दुसरा वर्ग मिळाला म्हणून हे विद्वानं प्राध्यापक झाले. पण स्वारीला खरी आवड धंद्याची. त्यामुळें समसमां संयोग झाला आणि एका सुप्रभातीं या बहाद्दरानें कॉलेजचा राजिनामा दिला, आणि कॉलेजांतील एक दोन पट्टेवाले पळवून आणि वसतिगृहाच्या भोजनगृहांतील एक आचारी पळवून कॉलेजच्या अगदीं समोरच एक आलिशान हॉटेल सुरू केलें. कॉलेजच्या विद्यार्थ्यांना सवलतीचें दर ठेवले. कॉलेजच्या लहानमोठ्या सर्व समारंभांची कंत्राटें त्यालाच मिळूं लागली. प्राध्यापकांना तर–पण हा गूढांत गूढ भाग सांगणें म्हणजे म्हाताऱ्यानें उल्लेख केलेल्या व्यावसायिक नीतीला सोडून होईल.

आमच्या रिकामपणावर निखारे ठेवणारा आणखी एक उपक्रम म्हणजे सांस्कृतिक या साळसूद नांवाखालीं धुमाकूळ घालणारे महाभयंकर कार्यक्रम ! नाच, गाणीं, तमाशे, नकला, नाटकें, चित्रविचित्र पोशाख स्पर्धा, सहली, व्याख्यानें, परिसंवाद वगैरे वगैरे अनेक गोष्टींचा या औरस चौरस प्रकारांत समावेश होतो. या सांस्कृतिक कार्यक्रमामुळें एका अर्थशास्त्राच्या प्राध्यापिकेनें गाण्याचा व नाचण्याचा वर्ग सुरू केला. या वर्गाच्या बळावर रशियाला जाणाऱ्या सांस्कृतिक शिष्टमंडळांत तिला मानाचे पान मिळाले. आणखी एका प्राध्यापकानें दरवर्षी कॉलेजमधील सहलीबरोबर जाऊन जाऊन शेवटीं भारतपर्यटन करणारी एक प्रवासी संस्था स्थापन केली व हजारों रुपये मिळविले.

मला सगळ्यांत कशाचे भय वाटत असेल तर ते कोणत्याही स्पर्धेला परीक्षक होण्याचे. रिकामा वेळ असला कीं असल्या आफती उपटतात. घाणेरडी नाटकें, भिकार भाषणें आणि बेसूर गाणीं तासन् तास ऐकण्यापेक्षां खुशाल जीव द्यावा असा प्राणघातक विचार डोक्यांत येतो. आमचे रिकामपण म्हणजे खरोखर आमचे मरण आहे. रिकामपणांत काय करावे आणि काय करूं नये असें होते.

आणि मग असला भिकार लेख कोणी एक प्राध्यापक रिकामपणीं लिहून हातावेगळा करतो. ●●●

# न्यायालयांतील विनोद



## सुटलों हेंच खूप !

मुंबईतील एका प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट साहेबांच्या समोर एका खिसेकापूवर खटला भरण्यांत आला होता. फिर्यादीचें म्हणणं असं होतं कीं बसमध्यें फिर्यादीच्या शेजारी आरोपी उभा होता व बसच्या हेलकाव्याचा फायदा घेऊन आरोपीनें फिर्यादीच्या खिशांतल्या नोटा लांबविल्या. प्रत्यक्ष नोटा फिर्यादीच्या खिशांतून काढून घेतांना आरोपीला कोणीच पाहिलं नव्हतं. नोटा गेल्याचे कळल्यावर फिर्यादीनें शेजारीच उभ्या असलेल्या आरोपीचा संशय घेतला व इतर प्रवाशांच्या सहाय्यानें झडती घेतल्यावर आरोपीजवळ रु. २५ च्या नोटा फिर्यादीच्या म्हणण्याप्रमाणें मिळाल्या.

आरोपीच्या वकिलानें अस्खलित इंग्रजींत असा बचाव दिला कीं, आरोपीनें खिसा कापलेला नाहीं. तो फिर्यादीच्या शेजारी होतां म्हणून बसच्या हेलकाव्यामुळें लागलेल्या धक्क्यांच्यामुळें त्याचा फिर्यादीनें संशय घेतला. त्यावेळीं आरोपी किरकोळ खरेदीला निघालेला होता. म्हणून त्याच्या खिशांत रु. २५ होते. प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटसाहेबांनी आरोपीला "आरोप नाशाबीत" म्हणून निर्दोष सोडून दिले, व "रक्कम ज्याची त्याला" देण्याचा हुकूम दिला. शिरस्तेदारानें हाच हुकूम मराठींत जाहीर केला. तो ऐकून आरोपी न्यायाधीशांना सलाम ठोकून परतला. शिरस्तेदारानें त्याला हांक मारून विचारलं, "कांहो ! पैसे नकोत कां तुमचे ?" आरोपी मागें वळला नि बोलून गेला, "नकोत बाबा ! सुटलों हेंच खूप झालं !"

## कायदा गाढव !

हायकोर्टांतील एका जज्जसाहेबांना निकाल देतांना एकीकडे समोर बसलेल्या वकिलांना उद्देशून शेरे मारण्याची संवय होती. एका केसमध्ये एका नाणावलेल्या वकिलाच्या पक्षकाराविरुद्ध ते निकाल देत होते. विनोदानें म्हणून ते त्या वकिलांना म्हणाले, "या केसच्या बाबतीत कायदा तुमच्या विरुद्ध आहे बरं कां ! तुम्ही गाढव म्हणतां ना त्याला ?" वकिलसाहेब उत्तरले, "खरं आहे ते ! I am just kicked !" (आतांच बसली आहे लाथ मला.)

## कांहीं वाईट नाहीं !

मोटार-अपघातांतून जखमी झालेल्या एका मध्यमवयाच्या स्त्रीनें मोटार मालकावर मोटार-ट्रायब्यूनलसमोर व प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट साहेबांच्या कोर्टांत असें दोन खटले भरले होते. मोटर–ट्रायब्यूनल समोरचा दावा ठराविक मुदतींत भरला गेला नव्हता म्हणून त्या ट्रायब्यूनलनें हा दावा कालातीत–उशीरा दाखल– Time-barred म्हणून काढून टाकला. त्यानंतर मॅजिस्ट्रेट साहेबांच्या कोर्टांतील पहिल्या तारखेस मोटार–मालकांच्या वकिलानें कोर्टास सांगितलें कीं "महाराज, जखमी फिर्यादीचा दावा मोटर ट्रायब्यूनलनें काढून टाकला आहे तरी आम्ही दयाबुद्धीनें १५० रुपये द्यावयाला तयार आहों. फिर्यादी पक्षानें कोर्टाला आवर्जून सांगितले कीं मोटर–ट्रायब्यूनलनें केवळ उशीरा आल्यामुळें दावा स्वीकारलेला नाहीं; त्यांत फिर्यादीच्या दाव्याबद्दल कांहींच निर्णय होत नाहीं. समझौता, होत असल्यास करावा, या बुद्धीनें मॅजिस्ट्रेट साहेब त्या मध्यम वयाच्या जखमी स्त्रीकडे वळून अभावितपणें बोलले, "पहा ! तुम्ही Time-barred आहांत, तरी हे तुम्हाला १५० देताहेत. वाईट नाहीं." कोर्टात हजर असणारे लोक कां हंसू लागले व फिर्यादी बाई कां लाजून गोंधळली हें मॅजिस्ट्रेटना कळेना !

— ॲड. यशवंत गोविलकर





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

( पान २६ वरून )

"आतां अजून कवां धाडतोस ?"

"आमची ही सध्यां म्हायेराला गेली न्हवं कां. आठ दिसानी ती त्रापस यील. माजी खान्या-पिन्याची तारांबळ व्हाया लागलीया. तंवा ती आल्यावर बाईला धाडतो तुज्याकडं."

"तसं जमत न्हाई."

"जमविल्यास सारं जमतं."

"अजून दुसऱ्या कोंच्या गोष्टींत जमंल; पर ह्या गोष्टींत जमायचं न्हाई."

नामा असं इरेला पेटला तेव्हां गोपाळाहिं निर्धारानं म्हणाला—

"मंग मला बी तिला धाडायचं न्हाई."

"बाईवर काय हाक हाय तुजा ?"

"तुजा तरी काय हाक हाय ?"

"म्या आनलंया त्यानला."

"तू आनलंस तसं म्यावी आनलंया."

नामा संतापला. दांत-ओठ खात म्हणाला—

"गोपाळा, बाईला मुकाट्या माज्या हवाली कर."

"तुज्या हवाली करीत न्हाई. कर जा काय करायचं आसंल ते."

"पाटलाकडं रपूट करीन, तुला ठाण्याला चालन करीन."

नामा असं बोलला तेव्हां गोपाळा तरा तरा पुढं आला, त्यानं गोपाळाच्या दंडाला धरून बाहेर लोटलं व दाराला आंतून कडी घातली.

गोपाळनं दार लावून घेतलेलं पाहून तर नामाचा फारच जळ-फळाट झाला. तो तडक तेथून निघाला आणि अण्णाजीराव पाट-लाच्या वाड्यांत आला.

अण्णाजीराव पाटील बैठकींत बसले होते. नामा तडक बैठकींत आला व तिरिमिरीला आल्यावनी म्हणाला--

"पाटील आमी ह्या गांवांत न्हावं का न्हाई ?"

पानाचा विडा सावकाश तोंडांत कोंबीत अण्णजीरावानी विचारलं—

"काय झालं रं ?"

नामानं घडलेला सारा प्रकार निवेदन केला. पाटलांनी त्याचं सारं एकून घेतलं व डहाळजंच्या खालीं पिंक टाकीत विचारलं—

"आतां कुठं हाय तो हरामखोर ?"

"घरींच हाय. दिवसा ढवळ्या तिला घरांत घेऊन तो दार लावून बसलांय."

अण्णाजीरावांच्या मस्तकांत राग शिरला. त्यानी ताबडतोब हांक मारली--

"शंकऱ्या."

शंकऱ्या महार हातांत तमाखू चोळीत बाहेरच्या दाराजवळ बसला होता. पाटलाची हांक येतांच तो लटकन हलला. त्यानं घाईनं तोंडांत तमाखू टाकली व पाटलाच्या समोर त्यानं अदबीनं विचारलं—

"जी मालक ?"

"सुताराच्या गोपाळाकडे जा आन् ताबडतोब त्याला बोलावून घेऊन ये."

एवढ्यांत अण्णाजीरावाला कांहीं तरी आठवलं. त्याला थांबवित ते म्हणाले—

"आन् हें बग. त्यानं घरांत एक बाई आनलीया. तिलाबी संग घेऊन ये म्हणावं."

शंकऱ्यानं मान हलविलं व तो झटपट तेथून गेला.

नामा कांहींसा स्वस्थ बसला. आतां बाई आपल्या ताब्यांत येणार याचा त्याला आनंद वाटला. त्याच आनंदांत त्यानं एक विडी पेटविली.

थोड्या वेळानं शंकऱ्या आला आणि शंकऱ्याच्या पाठोपाठ गोपाळाहि आला. त्याच्या बरोबर ती बाई दिसत नाहीं असं पाहून अण्णाजीरावानी विचारलं —

"ती बया कुठं हाय रं ?"

"हाय की भाईर."

"भाईर काय करतीय ?"

"मदी यायला लाजायलीया."

"अदोगार तिला मदी ये म्हनावं. काई लाजाय-विजायचं असलं तर म्हागनं लाजत बसं म्हनावं."

गोपाळा तिला बोलवायला गेला. कांही वेळानी गोपाळा आला आणि त्याच्या पाठोपाठ तीहि लाजत-मुरडत आंत आली. पाटलानी बराच वेळ तिच्याकडं टक लावून पाहिलं आणि मग तिला भिंतीच्या आंतल्या बाजूला बसायला सांगितलं.

ती आंत गेल्यानंतर पाटलानी दोघाकडंहि पाहिलं. आणि त्यांच्या चेहऱ्यावर राग पसरूं लागला. रागानं त्यांचा चेहरा फुलत चालला. लाही फुटावी तसे अण्णाजीराव बोलले—

"कुठनं आनलाव रं तिला ?"

त्यांचा असा बदललेला अवतार पाहून नामा चकित झाला. दबकत बोलल्यावनी तो बोलला—

"तेरच्या जतरंहून आनलं."

"एवढ्यासाठी गेलताव व्हयरं तेरच्या जतरंला ?"

"न्हाई."

"मंग कस्याला गेलताव ?"

"गोरबाकाकाच्या पाया पडायला गेलाताव."

"मंग गोरबा काकाच्या पाया पडायला जाऊन असले धंदे करताव व्हयरं ?"

अण्णाजीरावानी असा भडीमार सुरूं केला तेव्हां नामा टरकला. गोपाळा बाईला घेऊन आल्यानंतर तो गोपाळाला कान पिचकी देईल व बाईला आपल्या स्वाधीन करील असं त्याला वाटलं होतं. पण पाटलानी दोघांनाहि फैलावर घेतलेलं पाहून तो मनांतल्या मनांत टरकला. तोहि कांहीं न बोलतां बसून राहिला.

नामा गप्प बसलेला पाहून तर अण्णाजीरावाला अधिकच जोर चढला. आपला मोहरा आतां मोक्याच्या ठिकाणीं घ्यायला हरकत नाहीं असं वाटून त्यानी विचारलं—

"कुन्या गांवची हायरं ही बाई ?"

आपण एवढं बोललों. आतां गोपाळा थोडंतरी बोलंल म्हणून नामानं वाट पाहिली. पण तो अजूनहि गुडघेमिठी घालून बसला






होता. तो कांहीं बोलत नव्हता किंवा नजर उचलून वर पाहतहि नव्हता. आतां आपणच हात-पाय हलवावयास हवं असं वाटून तो म्हणाला –

"गांवाचं नांव ठाव न्हाई."

"तिला कुनी गनगोत तरी हाय का न्हाई?"

"आय तेवढी हाय म्हनं."

"कुन्या गांवांत हाय?"

"तेबी ठावं न्हाई."

"आन् तिला नवरा?"

"नवऱ्यानं सोडलंय म्हनं."

"का सोडलंय?"

"ते काय ठावं न्हाई"

अण्णाजीराव भडकले–

"मंग ठावं तरी काय तुमाला? ती कुन्या गांवाची हाय हे ठावं न्हाई, तिची माय कुन्या गांवची हाय हें ठावं न्हाई, तिला नवऱ्यानं का सोडलं हेबी ठावं न्हाई, मंग ठावं तरी काय हाय तुमाला?"

"इचारायचं काई कामच पडलं न्हाई."

"आतां पसवर पडलं नसंल; पर आतां पडलं म्हंजी? समज, ही नवऱ्यापसनं पळून आली आसली तर तिचा नवरा तिचा तपास करील, आपल्या गांवांत ही हाय आसं समजलं तर तो पोलिस ठाण्यावर जाईल, आन् तुमच्यावर कारवाई करील. मंग तुमालाबी खटपट यील आन् मलाबी खटपट यील."

पाटलानी असं सांगतांच नामा कांहींसा अस्वस्थ झाला आणि गोपाळा गुडघ्याला आणखी घट्ट मिठी आवळून बसला.

पाटलानी हात-पाय पसरले. व चंची उघडून पानाचा सरंजाम जमवित ते म्हणाले —

"बरं झालं, एव्हडयावर तर निभावलं. आतां मुकाट्या घरला जावा. पुना कंवा असल्या भानगडींत पडूं नका."

पाटील असं बोलले तेव्हां गोपाळा उठला आणि खालीं मान घालून तो गुपचूप गेला. गोपाळा गेला तरी नामा अजून बसूनच होता. पाटलानी पानाला चुना लावीत विचारलं –

"तूं का बसलास रं?"

नेट धरून नामा म्हणाला,

"बाईची काय सोय लावताव?"

"ती कोन कुठली ह्येची इचारपूस करतो आन् उंद्याह्याला काय तरी येवस्था लावतो तिची."

"तुमी कस्याला एवडा तरास घेताव. म्याच तिची इचारपूस करतो आन् सकाळच्याला तिला तिच्या गांवाला न्हीऊन घालतो."

"तूं तिला आतां घरीं घिऊन गेलास आन् पुना तुमचे भांडनं लागले म्हंजी रं?"

"आतां आमी भांडत न्हाई."

"हितं आसं म्हनशील आन् घरीं गेल्यावर भांडत बसचील."

"आयशप्पत भांडत न्हाई."

"तूं कितीबी बोललास तरी तुमच्यावर इस्वास न्हाई गड्या माजा. हितं आसं म्हनतोस पर घरीं गेल्यावर टकुरे फोडल्यासिवा न्हायचे न्हाव."

अण्णाजीराव आसं बोलले तेव्हां नामा निर्धारानं म्हणाला–

"आमची बाई आमच्या हवाली करा आन् काई गैरात आली तुमाकडं तर मंग मला बोला."

"तूं आता कायबी म्हनलास तरी बाईला तुज्या हवाली करतां येत न्हाई."

"का?"

"करायला येत न्हाई एव्हडं खर."

नामाहि संतापला. बसल्या जागचं उठत तो म्हणाला–

"म्या पोलीसांत जानार हाय बगा पाटील."

पाटील ढ्हाळजंतून खालीं उतरले आणि आंतल्या घरांत जात म्हणाले–

"पोलीसांत जा न्हाई तर अजून कुठं जा."

पाटील आंत गेल्यानंतर नामा कांहीं वेळ थांबला. त्यानं मनाचा निश्चय केला आणि घराकडं न जातां त्यानं पोलीस-ठाण्याचा रस्ता धरला.

दुसऱ्या दिवशी दुपारच्या आंतच पोलीस-ठाण्याहून जमादार आला. त्यानं पाटलाना गांवच्या चावडींत बोलवून घेतलं आणि खडसावून विचारलं–

"पाटील, या माणसाची काय भानगड आहे?"

ज्ञानबा जमादारापुढं चंची टाकीत पाटील म्हणाले–

"त्यानं सांगितली असंलच कीं तुमाला!"

"सांगितली की."

"मंग मला काय इचारताव?"

"कुठं हाय ती बाई?"









"हायी की वाड्यांत."

"दुसऱ्याच्या बाया सोताच्या वाड्यांत ठिवून बसताव व्हय ?"

नामाकडं बोट दाखवीत आण्णाजीराव म्हणाले–

"ह्यानं काढून आनलीय ती बाई."

तक्रारीच्या आवाजांत नामा म्हणाला–

"म्या काढून आनलेली न्हाई."

ज्ञानवा जमादार त्याच्यावर डाफरून म्हणाला–

"तूं चूप बस बे" आणि तो तोंडांत मारल्यावनी बसल्यानंतर त्यानं परत पाटलाना विचारलं–

"त्यानं काढून आनलं म्हणून तुमी घरांत ठिवलं व्हय तिला ?"

"काढून आनलं म्हनून ठिवलं न्हाई. त्येच्यावर आगर माज्यावर कसली खटपट यिऊनी म्हनून ठिवलं."

"मंग वाड्यांत कां ठिवलं ?"

"कुठं ठिवायचं व्हतं ?"

"चावडी न्हवती का ?"

"आन् रातरी राखण कुनी बसायचं व्हतं तिला ?"

"गांवचा म्हार न्हवता का ?"

"गांवकीच्या म्हारावर इश्वास ठिवायचा व्हता का ?"

"मंग ठाण्याला धाडायची व्हती."

"काल दिवस मावळलां माज्या ताव्यांत आली. मंग ठाण्याला कंवा धाडायची व्हती ?"

"दिवस मावळल्यावर धाडायची व्हती."

"कुनासंग धाडायची व्हती."

"तुमी सोता यायचं व्हतं."

"आन् माजं घर कुनी संवाळायचं व्हतं ?"

"तुमच्या घरांत व्हवतं का कुनी ?"

"माज्या घरांत कुनी असतं तर तिला वाड्यांत ठिवतां तरी आलं असतं का ?"

म्हंजी रातरी दोघंच व्हता का वाड्यांत ?"

"मंग अजून तिसरं कोन आसायचं तर ?"

"काल कुनी हिच्या घरचं आलं असतं आन् तुमच्यावर कारवाई केली असती तर कसं करनार व्हता ?"

"आज तिला धाडणार व्हतो न्हवं का ?"

"कंवा दुपारी धाडणार व्हताव का सांच्याला धाडणार व्हताव ?"

"दुपारा धाडणार व्हतो."

गुरकावून बोलल्यावनी जमादार म्हणाला–

"बरं बरं, आतां बास करा. आतांच्या आतां घरीं जावा आन् म्हाराबरा धाडून द्या तिला."

अण्णाजीराव चावडीच्या पायऱ्या उतरले. नामा पसरट तोंड करून जमादाराकडं पाहत बसला होता. जमादार त्याच्यावर खेकसला–

"आरं ये व्हगाड्या, असा का थोबाड करून बसलास. च्या घेऊन ये अेक"

नामा चहा घेऊन आला. तेवढ्यांत ती बाईहि आली. जमादारानं तिच्याकडं पाहिलं. बराच वेळ न्याहाळून पाहिलं. आणि मऊ आवाजांत तिला म्हणाला–

"जरा तिकडं बाजूला बसा तुमी."

आणि बाई आडमोरी बसल्यानंतर त्यानं नामाला खडसावून विचारलं–

"कुंठनं पळवून आनलंस हिला ?"

"पळवून आनलं न्हाई."

"मंग काय ती आपुआप तुज्या म्हांग आली का ?"

आजवर किती बायका आनल्यास पळवून ?"

"म्या पळवून आनलं न्हाई."

"अस्यानं कुठला तूं सांगायला. एकदां ठाण्यांतला हिसका दावायला फायजी तुला." आणि बसल्या जागचं उठत तो म्हणाला, "फौजदारसाहेब, सध्यां फिरतीला गेलेत. ते आल्यावर ठाण्याला यावं लागंल तुला."

नामा हात जोडून म्हणाला–

"आसं करूं नका सायेब, बाईला म्या आनलंया. हवालीं करा माज्या त्यानला. लई उपकार व्हतील तुमचे."

त्याच्यावर तिरस्काराच्या नजरेनं पाहात जमादार म्हणाला—

"चल बे उपकार के बच्चे" आणि आडबाजूला बसलेल्या बाईला ज्ञानवा जमादार म्हणाला–

"चला बाई, पोलीस ठाण्याला यावं लागंल तुमाला."

बाई मुकाट्या उठली. जमादाराच्या मागोमाग चालूं लागली. आणि नामा व्याकूळ नजरेनं तिच्याकडं पाहत राहिला.

☆ ☆ ☆ ☆

सकाळच्या पहिल्या प्रहरींच ज्ञानवा जमादार घरांतून बाहेर पडला आणि पोलीस–ठाण्याची वाट सोडून तो आड वाटेनं गांवांत निघाला. गल्लीच्या तोंडाशीं तो आला आणि एवढ्यांत एका अनोळखी इसमानं त्याला रामराम घातला. ज्ञानबानं रामराम घालून समोरच्या माणसाकडं पाहिलं, त्या माणसानं गालांत हंसत ज्ञान–बाला विचारलं—

"काय जमादारसाब, दवाखान्यांत निगालाव का?"

ज्ञानवा जमादार चकित झाला. आपण दवाखान्यांत निघालों हें या माणसाला कसं ठावूक झालं, हें त्याच्या लक्षांत येईना. तो कुणाजवळ यासंबंधीं बोलला नव्हता किंवा तो आजारी असल्याचं त्याच्या चेहऱ्यावरून दिसत नव्हतं. असं असतांना आपण दवाखान्यांत निघालों हें या माणसाला कसं ठाऊक झालं याचंच त्याला आश्चर्य वाटलं. तरी तो चेहऱ्यावर तसं कांहीं न दिसूं देतां म्हणाला

"न्हाई, जरा हिकडंच निगालों."

तो माणूस कुचकं हसून चालूं लागत म्हणाला—

"आतां हिकडं-तिकडं जाऊं नका. सरळ दवाखान्यांत जावा. असल्या कामांत दिरंगाई कामाची नसते."

ज्ञानबाला नवल वाटलं. हा माणूस सारं कांहीं ठाऊक असल्यासारखं बोलत होता. हा माणूस या गांवाचाहि दिसत नव्हता असं असतांना याला हें ठाऊक कसं झालं ? मनाशीं नवल करीत ज्ञानबा जमादार पुढं चालूं लागला—

पायऱ्या चढून तो दवाखान्यांत आला. बाकड्यावर बसलेल्या अण्णाजीराव पाटलानी त्याला रामराम घातला व मिशांत हंसत त्याला विचारलं—

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

"तुमीबी आलाव का जमादार सायेब ?"

आण्णाजीराव पाटलांची नजर चुकवीत ज्ञानवा जमादार म्हणाला—

"म्या आपलं सहज आलों."

"त्या गोपाळचालावी म्या आसंच सांगितलं वगा."

गोपाळचा कोण हा हें लक्षांत न आल्यामुळें ज्ञानवानं विचारलं—

"कोण गोपाळचा ?"

"आवो तो आमच्या गांवचा गोपाळचा न्हवं का. आतांचं तर इथनं गेला. ती बाई त्याच्याकडंच पयल्या झूट व्हती न्हवं का."

आतां वाटंत भेटलेला माणूस कोण होता आणि त्यानं आपल्याला तसं का विचारलं हें आतां त्याच्या लक्षांत आलं.

ज्ञानबा आंत डोकावून पाहूं लागला तेव्हां अण्णाजीरावानी परत विचारलं—

"फौजदारसाब, आजून फिरतीवरनं आल्यावनी दिसत न्हाईत."

"न्हाईत आले."

"तरी मला वाटलंच."

"काय वाटलं ?"

"फिरतीवरनं आले असते तर त्येंची हितंच भेट झाली असती न्हवं का" !

इतक्यांत डॉक्टर इंजक्शन घेऊन आले. अण्णाजीरावाना इंजक्शन देत त्यानी ज्ञानवाला विचारलं—

"कुणीकडं जमादार साहेब ?"

अण्णजीरावाकडं नजर टाकीत ज्ञानबा म्हणाला—

"तुमाकडंच आलतो."

"आंत बसा, इंजक्शन देऊन आलोच."

अण्णाजीरावाना पाठविल्यानंतर डॉक्टर आंत आले. त्यानी ज्ञानबाला काय होतं हें विचारून घेतलं. त्याची तपासणी केली व कांहीसं स्वत:शीं कांहीसं ज्ञानबाशी बोलल्यावनी ते बोलले —

"तुमच्यासारख्यांनीहि असल्या वायकांच्या फंदांत पडावं याचं आश्चर्य वाटतं !"

ज्ञानवा कांही बोलला नाहीं. त्यानं शरमून खाली मान घातली.

डॉक्टरानी ज्ञानवालाहि इंजक्शन दिलं. गोळ्या दिल्या. त्या गोळ्या केव्हां आणि कशा घ्यायच्या हें सांगितलं. ज्ञानबानी हें सारं ध्यानांत ठेवलं आणि तो दवाखान्याच्या पायऱ्या उतरला. तो रस्त्यावर आला आणि एकदम त्याच्या मस्तकांत तिडीक उठली. त्यानं ठरविलं की, असंच घरीं जायचं आणि त्या बाईच्या पेकाडांत लाथ मारून हाकलून द्यायचं. मनाशी असा विचार करून ज्ञानबा जमादार घराकडं निघाला. एवढ्यांत ठाण्यातला अेक पोलीस त्याला आडवा आला व ज्ञानवाला सॅल्यूट ठोकून तो घाबरलेल्या आवाजांत म्हणाला —

"सायेब, बोलवितेत तुमाला."

ज्ञानवा मनांत चरकला. घाबरून म्हणाला—

"साहेब कंवा आले ?"

"आतांच आलेत. तुमच्यावर लई तापलेत."

"कां ?"

"मांजरीची कोन ती बाई आनलीय म्हनं की तुमी. तिथला नामा म्हनून एक मानूस सायबाजवळ रडत वसलाय."

ज्ञानबा दचकला. आतां आपली धडगत नाहीं हें त्यानं ओळखिलं. पण त्यापेक्षां एका दुसऱ्याच गोष्टीची त्याला फार भीति पडली. समजा फौजदार साहेबानी त्या बाईला पाहिलं आणि चौकशी करण्यासाठीं जवळ ठेवून घेतलं तर... आणि फौजदार साहेबानी तिला ठेवून घेतल्याबद्दल हा माणून डी. एस. पी. साहेबाकडं ओरडत गेला तर... आणि डी. एस. पी. साहेबानीहि तिची चौकशी करायची ठरविली तर.......

•••

## साभार पोंच

**औदुंबर**
लेखक : श्री. दा. पानवलकर
मौज प्रकाशन गृह
मूल्य : ६ रु.

**अभिसार**
कवी : ना. घ. देशपांडे
मौज प्रकाशन गृह
मूल्य ४ रु.

**सामण दिवा**
लेखक : दि. बा. मोकाशी
मौज प्रकाशन गृह
मूल्य : ५ रु. २५ पै.

**मी हरलों ! मी जिंकलों**
लेखक : विजय तेंडुलकर
मौज प्रकाशन गृह
मूल्य : ३ रु.

**वंवरेखा**
लेखक : वलराम नांगरे
प्रकाशक – गं. रा. पाठक ३ (जुना) सदाशिव, पुणें २.
मूल्य : ५ रु.

**गंधमोहिनी**
लेखक : श्रीकृष्ण पोंक्षे
सरस्वति प्रकाशन, पुणें २.
मूल्य : ३ रु.

**रात्र थोडी सोंगें फार**
लेखक : ग. रा. कामत
मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगांव, मुं. ४.
मूल्य ६ रु.

**भावार्थ ज्ञानेश्वरी**
लेखक : गो. नी. दांडेकर
मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४
मूल्य : ६ रु. ५० पै.

**मंतरलेलें बेट**
लेखक : व्यंकटेश माडगूळकर
मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४.
मूल्य : ३ रु.

**यात्रा**
लेखक : श्री. ज. जोशी
मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४.
मूल्य : ५ रु.

**काळा समुद्र**
लेखक : वामन इंगळे
मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४.
मूल्य ३ रु.

**आकाश पाळणा**
लेखक: वामन प्रभू
मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुं. ४.
मूल्य ५ रु.

•••








अनुक्रमणिका






# लवंगी मिरची

—डॉ. सरोजिनी बाबर



*पापडाच्या लाट्या चवदार. त्याहून पापड चवदार पण पापड लाटतांना उसळलेला हा उखाण्यांचा सागर मात्र मनें हेलावणारा !!*

*सांभाळा हं ! नाका तोंडांत पाणी गेलं तर मग कराल तक्रार !!!*

**त्या** दिवशीं दारीं टिप्पूर चांदणं पडलेलं. घरांत लगीन जवळ आलं वतं तर आम्हीं आपल्या आमच्या अंगणांत जमलेल्या. हातीं पोळपाट लाटणं. वर पिठांत माखलेली पापडाची लाटी. आणिक कोण कोण शेवायापण करतेल्या. तशी इकडून तिकडूनच आपलं बोलणं निघा-लेलं तर गंमत म्हणून आमच्या किशीनं मजाच केली हं ! हातांतला लाटा गोळचा तोडून खपला म्हणतांना तिनं त्यांतलीच एक गोळी घेतली आणिक रामू शेटच्याच्या चिंगीच्या अंगावर फेंकली ! फेंकली तर चिंगीनं एवढा एकेक डोळा करीत म्हटलं कसं, "काग ? सगळयांनीं सारक्या गोळचा उचला." आणिक तिनं तो गोळा पुन्हांच्यान् दिला किशीच्या अंगावर टाकून. आतां खरं तर एवढचावर त्यांनीं गप्प बसायचं हं ! पण अंऽहं ! तिच्या-पेक्षां वरचढ डोळे मोठे करीत दांत ओठ खाऊन किशी झटक्यासरशी ओरडली, "आला आला रुखवत, त्यावर ठेवला तवा, रामजी पाटील आल्यात तर तुमी एकदम जावा !"

त्यासरशीं सगळचा जणींच वचकल्या न् पदर सांवरून दिंडी दरवाजाकडं बघायला लागल्या. तशी किशी पुन्हां बोलली, "आला आला रुखवत, त्यावर ठेवली पानं पोतं न डोळं वटारील ती होईल भुशाचं भलं दांडगं पोतं!" आणि मग जो हंशा पिकलाय म्हणतां ! छे ! एकेकीची हंसून मुरकुंडी वळली. मग चिंगीनं त्यांत फोडणी टाकली. म्हणाली कशी, "अग येऽऽ मी काय यीन करनीची नव्हती काय ? करीतच हुते न् अजूनबी करीनच म्हनते. यीन म्हटली मला चोळी शीव पन मेल्या त्या शिप्याला दिंडी काढताना रातीच भरलं हीव त्या गतीला मी जी काय करावं ?"

आणि मग जसं काय उखाण्याचं पेवच फुटलं म्हणीनासा ! पापडाच्या जोडीलाच शेवया करणारणींच्या शेवया घटकाभर पाटा-वरच थडकल्या आणिक चाळणारणींचे हात गोळे यावेत तसे अडखळून गेले. म्हणतांना आमच्या आज्जींन मधेंच तोंड घालीत म्हटलं हं, "इकडून डोंगर, तिकडून डोंगर मधोमध भालू कुत्र भुकतं न् विहीण घरांत याची म्हटली कीं, माजं डोस्कं बघून घ्यावं असं उठतं !" त्यासरशी सगळचाजणी जशा काय लोळण-फुगडी खेळायला नटल्याच म्हणा ! म्हणताना मग एकापेक्षां एकीला जोर चढला न् रुखवत घरांतच दणाणला—

"यीहीन आली तर येऊं दे. तिला वजरटीक करीन म्हटलं वेलपानाची न् नथ फाशाची. तर मेलं सोनाराला सजा व्हावी कां अवचीतच सुळावर चढायची ? न्हवं मी काय करनीची नव्हते का करनारी न्हाई ? अवो करीत हुते न् करीन बी म्हनते पन ह्या गतीला करूच काय ?"

"यिहीनीला लई दिसांनी आलीया तर म्हटलं जेवान करावं पोळयाचं पन सांगायचं मजी पानी कवांच आटलंय तळयाचं न् रेडकूबी मरून गेलंया कोळयाचं ! न्हाईतर मी एका पायात्र तयार जी !"

"आतां पन यिहीनीला करीन म्हटलं ताक तर वाई· आत्ताच गेलाय डेऱ्याखालीं साप ! वरं तिला वाढीन म्हटलं दूधभात तर राती म्हशीनं जी दिली लाथ ती दुधाची चरवी सांडली पार अंगनात ! आनिक निदान भरावी म्हटलं तिची वटी तर न्यावी का जी उंदरानं नेमकीच खोबऱ्याची वाटी ? आतावो ?"

"आला आला रुखवत त्यावर ठेवली चंची तर लोकाचं लुगडं नेसून मांडवात मिरवायची सव हाय ती यीहीन कोणची ?"

"समोरच्या घरात कोनाडा. त्यात होती सरी. सरी गेली सरकून.रुखवत घेतला पारखून; तर कळलं की, यीहीनीच्या घरात आमी दिल्याले बुंदीचे लाडू बघून करणीच्या ध्यान सगळयांलाच हीव आलं भरून ?"

"रुखवत आला रुखवत आला काय त्येला शोभा. त्यावर ठेवला झुबा. पण बघतीया तर यीहीनीचा कान जसा काय आगीन गाडीचा डबा."

"हाराभरून केल्या पुऱ्या तर यीहीन म्हणती झाल्या झुरझुऱ्या. बारा पायलीच्या केल्या रोटचा तर यीहीन म्हणती खऱ्या का खोटया. बारा पायलीच्या केल्या वड्या तर यीहीन म्हणती झाल्या लईच थोड्या. मेलीनं बारा पायलींचा खाल्ला भात न् पेली बारा शेर तूप तरीबी न्हाईकी आलं तिला रूप ! अवो, बारा खणांची शिवली चोळी तरी म्हणतीया हं की, न्हाई घळघळी ! आता ? चांगली चौदा तोळयांची तिला घातली ठुशी तरी होत न्हाई तिच्या मनाची खुशी. तवा म्हणावं असल त्यात हो राजीखुशी न्हाईतर न्हवरा मुलगा तेवढा हित ठेवून जा बघू म्हणावं आलीस तशी !"

'तेवढयांत ऐकावंजी !' एवढंच बोलून चिंगीनं दिला बार उडवून. म्हणाली कशी,

"आला आला रुखवत आळी बोळांनी न् यीहीनीचा कान खाल्ला टोळांनी !"

"आला आला रुखवत त्यावर होती काडी, यीहीनबाई सदाचीच मारती बेडूक उडी."

"आला आला रुखवत त्यात होती पणती आमची यीहीनीबाई चिचुंद्रीवाणी बोलती."

किशीनं तिला थांबवीत आपली अक्कल काढली–

"यीहीनबाईला रुखवतावर दिली असती म्हटलं मोटार पन त्येंच्या घरचा रस्ताच लई वंगाळ त्येनं घोर पडलाया फार तरीपण त्येंचं म्हणणं की, ठेवा रुखवतावर पेरू, न् द्या तुमी मोटार मग बघूं आम्हीं रस्त्याचं कसंबी करूं. अग पण मी ठेवला रुखवतावर लसूण आणिक त्यास्नी म्हटलं जावा तुमी कैका-डयाच्या गाढवावर बसून !

मग आमच्या मावशीला आला जोर. कधी तोंड उघडायची नाहीं ती कणकीचा गोळा घोळ-वीत बोलली हं, "मांडवाच्या दारी शिद्योची पाटी, यीनीबाईच्या कपाळाला वरुटया-वाणी आठी. आतां ही अशी आठी कशान काढूं बारा भुयांची पालखी घाडूं. यीन म्हणती मला कशाला पालखी मी तर तुळशीच्या फुलापेक्षां लई हालकी. यीनीनं सहज दिली पालखीला मांडी तर मोडून पडली पालखीची दांडी. म्हणून यीहीनीला जोकून बघितली तर ती भरली चांगली सव्वा खंडी !!"

यावर सगळयाजणीची हंसून हंसून बेजार व्हायची वेळ आली. मग सुंद्रीकाकूनं टाकली फोडणी न् दिला भडीमार उडवून–

"शिवरात्रीचं पारणं, करती जिवाच्या कारणं, नऊ नारळ, बत्तीस केळं, द्राक्ष सीताफळं अंजीर, काशी भोपळ, विहीणीनं केला फराळ बळं बळं, खाल्ली चांगली हराभर केळं, विहीणीनं केला फराळ नागर, खाल्ली पोतंभर भगर, विहीणीनं फराळ केला बारका न् खाल्ल्या चांगल्या पोतंभर खारका. फराळ झाला, मळयाला गेली, रसाची काहील प्याली, गुळाची एक ढेप एका घासात फस्त केली. चार पायल्यांचे शेंगदाणे खाल्ले. खंडीभर मक्याच्या भाजल्या लाह्या खाल्या आणिक त्या खातांना आमाला म्हणती कशी कीं, जाताय खजुरीच्या गोण्या आणाया का लावूं तुमास्नीच खंडयांखंडयांनीं उपासातापासाचं नीट बघीनासा म्हणून घपाटं खाया ?"

त्यावर आमच्या मधल्या काकूंची क्रमळी कशी म्हणती, "अग येऽऽऽबायकानूं ह्यो कम-ळीचा ढीग पहिला हलूं दे मग बसा बोलत. उखाण्यानं काय पोट भरणार हाय."

त्यावर आमच्या काकूनंच तिला उत्तर केलं. म्हणाली कीं, "व्हय ! भरतंया पोट. अग हसावं तरी कवा माणसानं मनमोकळं ! रुखवताचा उखाणा जलमलायच मुळीं हंसा-यला यावं म्हणून. लग्नाहेवात दमतं माणूस. तर अशा बोलण्यानं येतो हुरुप न् जातो कट्टाळा. ध्येनात घे तूं पण. चल चंद्रे तू सांग लांबडा गमतीबाज उखाणा. पण लई हात-घाईवर आणूं नकोस.

मग हातांतला गोळा बळीतच चंद्रीनं ठस-क्यानं उखाणा घातला.. म्हणाली, "आला आला रुखवत मांडवाच्या दारीं, वाट सोडा पाट टाका. पाट न्हवं घ्या घोंडा, चौरंग मांडा. दांत घासायला घ्या वासा, वासा पुरना तर मग तुळी तासा. तोंड धुवायला घ्या पाण्याचा हंडा, त्योबी न्हाई पुरना तर दारांत नवा रांजून मांडा. रांधा जेवण. करा राखण.

"बारा पायलींच्या केल्या भाकरी, न्हव-ऱ्याच्या घरी म्हनत्यात कीं लईजन हाईत चाकरी. बारा पायल्यांच्या केल्या तेलच्या, यीन म्हनती ठमकान्यानं की, असती शिळया कालच्या."

"अग रांडच्यानू ! राकूस हाय काय ?" चंद्रीच्या बोलण्यांत काकूनं मध्येंच तोंड घातलं. म्हणतांना ती थांबलेली पुन्हां बोलली, "ऐक कीं पुढचं. तर काय बरं म्हणत होते ?

## न्यायालयांत विनोद

### कसे फसणार ?

"तुझ्यावर ज्यांनीं इतका विश्वास ठेवला अशा लोकांना तूं फसवलंस तरी कसं ?"

"साहेब, आपल्यावर जे विश्वास ठेवत नाहींत अशा लोकांना कसं फसवणार ?"

### आधीं लग्न–मग पैसा–शेवटीं...

लॉस एंजेलिस येथील एका स्त्रीने लग्नानंतर ताबडतोब आपल्या नवऱ्यावर घटस्फोटाची फिर्याद केली. ती म्हणाली, "लग्न झाल्यानंतर लगेच तो मला आपल्या आवडत्या बारमध्यें घेऊन गेला आणि तिथें काऊंटरवर असलेल्या माणसाला म्हणाला – 'केलं कीं नाहीं मी तिच्याशीं लग्न ? चल, काढ पांच डॉलर आतां."

### तुम्हींच ओळखा पाहूं

एका माणसावर कोर्टांत खटला चालूं होता. माणूस अगदीं बेडर होता. शिक्षेबद्दल त्याला मुळींच पर्वा नव्हती. कोर्टाला कुठ-ल्याहि प्रकारची मदत करण्याची त्याची तयारी नव्हती.

"तूं गुन्हा केला आहेस कीं नाहीं ?" न्यायाधीशांनीं त्याला विचारले.

त्यानें न्यायाधीशाकडे कांही काळ विचारपूर्वक पाहिलें.

"तुम्हीं ओळखून काढा तें." तो म्हणाला, "त्याच्यासाठींच पगार मिळतोय तुम्हांला."

### मग चूक कोणाची ?

"युअर ऑनर," ज्यूरीचा फोअरमन म्हणाला, "फिर्यादीची बाजू ऐकल्यानंतर त्याचें म्हणणं बरोबर आहे असं आम्हांला वाटलं होतं. पण आतां आरोपीची बाजू ऐकल्यानंतर त्याचं सुद्धां म्हणणं बरोबर आहे असं आम्हांला वाटूं लागलंय."

"पण दोघांचंहि म्हणणं बरोबर असणं कसं शक्य आहे ?" न्यायाधीशांनीं विचारलें.

"तुमचं सुद्धां म्हणणं बरोबर आहे, युअर ऑनर," फोरमन म्हणाला.

–वि. रा माटकर

ह, बारा पायल्यांच्या केल्या पिठाच्या तर यीन विचारती न्हाईत न्हवं इटायच्या ? बारा पायल्याच्या केल्या लाटीव वड्या तर यीन म्हनती लई दिसत्यांत थोड्या."

"दाव कीं म्हणावं तूं करून ! मग बोल"– काकूला पुन्हां दम निघाला नाहीं तशी आज्जी तिला रागावली. म्हणून चंद्रीनं बोलली गोष्ट नीट ध्यानांत घेत आपलं घोडं पुढं दामटलं, "बारा पायलींच्या डाळीचा केला रस्सा तर यीन म्हनती अवो, पुरला कसा ? बारा पायलींची तळली भजी तर यीन म्हणती अवो, सर्वी असूं द्यात हं खमंग न् कुरकुरीत ताजी !"

"मेलीची चव तरी बघा." आतां न राहवून आजीच हंसली. तशी सगळ्याच हंसल्या; आणि मग किशी म्हणाली "पुढचं मी सांगते." पण चंद्री म्हणाली कीं, मला येतंय. आणिक मग तीच बोलली, "बारा पायलींच्या केल्या शेवाया तर यीन उठना जेवाया."

"अग हिचा मुडदा गेला." काकूनं पुन्हां शेरा मारला. पण मग हंसून चंद्री बोलत राहिली–

बम्रा पायलींचा केला भात तंवा कुठं यीनीनं घुतला आपला हात. ततंनं मग आमी गेलो अच्छयाच्या पेठेला. आणले बारा खण. सा खणांची केली चोळी. सा खणांची केली लाकपट्टी आणिक आतां होणार सगळा बोलबाला तर यीन म्हनती पाहिजे अंदान पानमळा न् ऊंसमळा."

"जा म्हनावं ठोकत आल्या पावलानं ! काय तर ! लईच करावं मजी काय शानपना म्हनत्यात काय ?

आमच्या आज्जीनं जरा रागांत असं म्हटलं तर चंद्री म्हणती कशी, "आज्ये, ह्यो उखाणा हाय–खरं न्हवं !" तशी जो हंशा पिकलाय म्हणता कीं, बोलायची सोय नाहीं.

तरीपण चंद्री मोठी हुषार. तिनं म्हटलं कसं, "माझं म्हणणं पुरतं ऐका... तवा मग आमच्या ह्यांनीं जवा काय घेतलीय साठ तोळ्यांची ठुशी तवा यीहीनी बाईच्या मनाची झाली खुशी न् मग येते म्हटल्या शास भरायला भावल्यापाशी."

त्या सरशी मग आमच्या इंदीनं गंमत म्हणून हातांतला गोळा पाटावर वळीत एक उखाणा म्हटला, "आला आला रुखवत. गाडी केली बारामती. धारन पाहिली सोलापुरी. माप केलं कोलापुरी. वस्ती केली महाडामंदी. पाणी प्याले भोरामंदी. पेठ पहावी शिरवळची. दिपवाळी पहावी म्हमईची दसरा पहावा वडूद्याचा. बोरगांवीं घेतले तांदूळ. सडले रायगड किल्ल्यावरी. सूप झाडलं सासवडी. विछाना घातला धानवडी. वेळगाव शेळगाव. दह्यांतलं खामगाव. भिवरीन बोरगाव. नको मला तोंड दावूं. युवाय मिळाला आंधळ्या न् चंबळ्या तोंडाचा. शिरीं टिकला गंधाचा. घोंडा वधीना शिवचा. हुबळी धारवाडी लावली जाई. खरंच यीनीबाई तुमच्या गावचं नांव काय हाई ? गड सातारा नळाची दाटी. वाई धोम कृष्णा काठी. हात घोंड्याव केंजाळ.धावजी बुवानं दरोजा बांधला. रुपय पडले तीनशे हजार. त्याला खिडक्या लावल्या दाट, जाती येळ्याला वाट. येळ्याची वाट नऊ खंड जबर. घेते पायगुड्या पाटलाची खबर. कुडाळी गावांत कुडाळी गंगा. हडताळ मशव्याला जाऊन सांगा. हडताळ मस्वं केलं माळ्यांनी साजरं. युवायाला द्यीन म्हटलं हार गजरं. हार गजऱ्याला सोन्याच्या काड्या. खालीं निघाल्या बारा वाड्या. बारा वाड्या शिलेदारी. शेतगावी केला शिरा. गोपगांवचा पानमळा. कलकत्त्याची सुपारी. म्हमईची जायपत्री. पुण्याचा चुना. चिलावळीची पानं आणा. यिनीला यीनं म्हटलं लुगडी तर खालीं आली खिडकी उघडी. खालीं आला मरड्याचा घाट. या घाटाला पायऱ्या तीनशें साठ. चला माहुलीला जाऊं. क्रिष्णाबाईचं दर्शन घेऊं. कोरेगांवीं पाण्याचा ठाव धावना. यीनीच्या चवीला न्हाई ठावठिकाना. आणा कसं तुमी डिसकळचं गहू न् एवडं साजरं केलंय तर रुखवताचा राखा मान बहू. म्हणून म्हनते रुखवतात ठेवते जाईजुई. आणिक माझ्या आण्याला हिंमतीनं उत्तर घेऊन येणारी- सांगा बघून तुमच्याकडं असली नखरेल कोण हाई ?"

आतां मात्र हंशाचा कडेलोट झाला आणि बायका काम सोडून गडागडा लोळणार तर आंतून आमच्या बाबांचा आवाज खणखणला, "बायलामी रुखवत करायच्या आदीच काय गा ह्यो धुमाकूळ ? गुमान शेवाया करताय कां दावू हिसका एकेकीला ? उगं त्वांड सोडावं मजी ? घरांत बाप्ये माणसं हाईत ह्याची काय दाद फिर्याद ? आनिक आमची ही बी भवानी दांत काडून हांसतीय ते ?"

– त्या सरशी चिडीचूप झाली. आणिक आम्ही लागलो शेवाया वळायला न् चाळायला पण. तशी आमची आजी बाहेरून गरजली, "आला आला रुखवत मांडवाच्या दारीं. त्यावर ठेवला सिंहाचा छावा न् ऐकून झवाप उडत असल तर खुशाल निघून चावडीवर जावा." म्हणतांना आम्हांला एकदम हंसूं फुटलं पण आम्हीं आंतल्या आंत ती उकळी दावली. तेवढ्यांत आज्जी हंसली न् आंतनं बावा पण तीन मजली हंसून बोलले, "सगळं खरं पण आपल्या नव्या यीहीनीला ह्यांतलं कायच येत न्हाई तर आण्याला उत्तर देणार कोन तुमच्या गा ? एकाच अंगानं वरडून काय मजा येती काय ?"

त्यामुळं तपकीरीची चिमट ओढीत आज्जीनं आलेला ठसका गिळला न् म्हटलं कसं, "न्हाईच, त्या बायकास्नी हे जमलं तर मी त्येंच्या अंगानं रुखवत उघडीत बोलीन खडाखडी पन तवा मातूर द्यावी लागल मला पैठणीची घडी ! हाय तयारी ?"

मग बाबांनीं तिला उत्तर केलं "द्यीन म्हणून!" तर सांगायचं म्हणजे आम्हीं सगळ्या राहिलों हंसत बाजूला आणि आज्जी बाबांचेच सवाल जबाब रुखवताच्या उखाण्यांनीं असे रंगत गेले कीं, सगळी रात्र कधीं उजाडली न् शेवायाचं काम कधी संपलं तें आम्हांला जसं काय कळलंच नाहीं !

मग उगवत्या सूर्याला नमस्कार घालीत बाबांनींच आम्हांला सांगून टाकलं,

"सोनेरी डबीत अत्तराचा ठेवला पाहिजे बोळा आणिक युवायाला म्हणावं कीं, मी नवरीचा आज्जा असलो तरी माझा उखाणा पाहिजे असल ऐकायला तर आणा केशर शंभर रुपये तोळा न् उभं गाव पैलं करा गोळा. मंजी मग न्हाई एकेकाला ही लवंगी मिरची चवीला दिऊन लावलं न्हाई लोळायला तर नांव दीन सोडून माजं गोपाळा."

आम्हीं मग दातांत पदर धरून हंसत हंसतच आपापल्या घरीं निघून गेलो. तर बाई बाबांनी दरवाजांत येऊन आम्हांला हाळी दिली, "मळ्यांत चाललीथा हिरीवर मोट न् हंसतायसाच तर लई हंसून मरशीला म्हणून घ्या पैला पाण्याचा घोट. ●●●

## ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन




### "रंजक आणि हितकर उपदेश"

**मराठी** साहित्यांत सर्व वाङ्मयप्रकारांना उदंड वहर आलेला असला तरी लघुनिबंध हा वाङ्मयप्रकार तुलनेनें दुर्मिळच झाला आहे. साहित्यामधें, कांतेप्रमाणें हितकर आणि रंजक शब्दामधें उपदेश करण्याचें, जीवन विषयक दृष्टिकोन प्रकट करण्याचें सामर्थ्य हवें असा भारतीय साहित्यशास्त्राचा एक दंडक आहे. या दंडकाच्या सिद्धीसाठीं लघुनिबंधासारखा दुसरा साहित्यप्रकार नाहीं. असें असूनहि मराठी साहित्यांत या साहित्यप्रकाराची जी हेळसांड होत आहे ती फारशी निरामय आहीं.

अनवाणी चाल हा श्री. प्र. श्री. नेरुरकर यांचा एक सुंदर लघुनिबंध संग्रह आहे. यांत सोळा निबंध असून त्यांतील प्रत्येक निबंध कमी अधिक सुंदर आहे. श्री. नेरुरकर यांची स्वतःची अशी एक जीवन दृष्टी आहे. भारतीय अध्यात्म, संस्कृत आणि इंग्रजी विदग्ध वाङ्मय यांच्या संस्कारांतून ही दृष्टी आकारलेली आहे. कर्मयोगाच्या तत्त्वज्ञानाशीं मिळती जुळती अशी ही दृष्टी आहे. करुण रस आणि हास्यरस यांच्या बेमालूम रसायनाची मूस बनवून तिच्यांतून त्यांनीं या जीवनदृष्टीचा हृदयस्पर्शी पण खेळकर प्रवाह खेळविलेला आहे.

स्वतःच्या साभारपरत लिखाणावर चिंतन करतां करतां ते भारतीय अध्यात्मांतील क्षणभंगुरतेचा सिद्धांत चटकन स्पर्शून जातात. तुटकी चप्पल टाकून तर देववत नाहीं आणि पायांत तर रहात नाहीं याचें वर्णन करतां करतांच ते स्थितप्रज्ञतेला भेट देतात. करुणा, विनोद आणि चिंतनशीलता यांचा या निबंधांतून जागोजाग दिसणारा संगम मोठा हृद्य आहे. अज्ञाताचा—मृत्यूचा—विसर कधींही पडूं द्यावयाचा नाहीं, पण त्याची जाणीव ही निवृत्ती अथवा हताशता याना कारणीभूत होऊं न देतां आला क्षण प्रवृत्तीनें, आत्मज्ञानानें आणि आत्मविश्वासानें जगावयाचा अशी जीवन दृष्टी त्यांच्या निबंधांतून डोकावते. जुनें जग मेलेलें आहे आणि नवें जन्मास येण्यास असमर्थ आहे असें ज्या संधिकालाचें वर्णन मॅथ्यू अर्नाल्ड करतो त्या संधिकालांत नवें जुतें पायांत नीट रुळेपर्यंत जुनें जुतें टाकून देऊं नये असा त्यांचा संदेश आहे.

संस्कृत, मराठी, इंग्रजी अवतरणें आणि चुटके यांनीं पुस्तकाच्या रंजकतेंत भर पडली आहे. प्रा. म. ना. अदवंत यांनीं आपल्या विस्तृत प्रस्तावनेंत श्री. नेरुरकर यांच्या निबंधांचे मूल्यमापन करतां करतांच समीक्षकाला कांहीं नवीन सांगण्यासारखें शिल्लक ठेविलेलें नाहीं.

**—उषाकांत**

[**अनवाणी चाल** लेखक-प्र. श्री. नेरुरकर अभिनव प्रकाशन, मुंबई मूल्य २ रु.]

☆☆

### आशयाशीं एकरूप झालेली शैली

**'शिळान'** या कथासंग्रहाने आणि 'घग' व 'अगतिका' या कादंबऱ्यांच्या लेखनानें प्रसिद्धीस आलेल्या श्री. उद्धव शेळके यांचा हा तिसरा कथासंग्रह, विदर्भातील मागासलेल्या आणि पददलित समाजाचें जीवन या कथासंग्रहांतील कथांतून त्यांनी चित्रित केले आहे.

वैदर्भीय जीवनाच्या सुखवस्तूपणाबद्दलच्या भ्रामक कल्पनांचा निरास श्री. शेळक्यांच्या लेखनानें होईल अशा तऱ्हेचे खास प्रशस्तिपत्र त्यांच्या कथासंग्रहाच्या मलपृष्ठावरील स्फुटांत दिले आहे.

शेळक्यांच्या आत्तापर्यंतच्या लेखनाचा विचार करतां परिस्थितीपायी पिचलेलीं गुदमरलेलीं अगतिक बनलेलीं माणसें हेंच त्याच्या लेखनसृष्टीचे विश्व आहे. त्यांच्या जीवनांतले अत्यंत सूक्ष्म बारकावे, तसूतसूभर तपशील, आणि त्यांच्या मनोवस्थांचीं अति तरल अशीं आंदोलनें शेळक्यांच्या लेखणीनें टिपली आहेत. त्यामुळें त्यांच्या या संग्रहांतल्या विविध कथा जरी दारुण दुःखाचे करुणरम्य दर्शन घडवीत असल्या तरी त्यांतला आशय विविध पातळ्यांवरचा आहे. एकाच विषयावर लहान मुलानें गिरवलेल्या अक्षरांसारखा गिरक्या घेत तो ढोबळ बनत नाहीं. त्यांची एकेक कथा येतांना भावानुभवांची एकेक लाट बरोबर घेऊन येते; आणि आपल्या सहानुभूतीच्या स्पर्शानें हृदयकमळाची एकेक पाकळी उमलवीत जाते.

**'दाद'** या कथेंत बलात्काराबद्दल 'दाद' मागायला निघालेल्या अगतिक बसंतीची करुण कहाणी आहे. तिच्या आजीची गांवच्या चावडीवर श्रद्धा आहे. चावडीवर कोणत्याही अन्यायाविरुद्ध दाद मिळते हा तिचा विश्वास आहे. खरें आयुष्य तिनें तें पाहिलें आहे. पण बदलत्या काळांचीं पावलें तिला कळत नाहींत. माणसांची पहिली दानत आतां राहिली नाहीं याचें तिला भान नाहीं. त्यासाठीं बसंतीला कोणत्या पशूंसमोर आपण कोणत्या अवस्थेंत उभें करीत आहोंत याची तिला खंत नाहीं. पण पाटलाला आपल्या कर्तव्याची नसली तरी अधिकाराची जाणीव आहे. न्यायाच्या नांवाखालीं आपण नंगा नाच घालूं शकतो याचा त्याला अभिमान आहे. म्हातारी पाटलाकडे बसंतीच्या उरावरच्या ओरखड्याची, चिखलांच्या बोटांची 'दाद' मागायला आली असतां पाटील आणि त्याचा चवचाल कंपू तिच्या ताठर तारुण्याला दाद देत आहे. आणि बसंती मात्र शरमेनें, शोकानें असहायपणें चिध्या झालेल्या चिरगुटांत आपली लाज सांवरण्याचा विफल प्रयत्न करीत आहे.

डोळ्यांतून हृदयांत उतरणारी अशी कथा हृदयांतले रक्त डोळ्यांत चढविण्याइतकी धारदार बनते. असा अनुभव शेळक्यांच्या इतरही कथांतून दिसतो.

मंगळवारचा उपास करणारा, लग्नांतला उरलेला बुंदा आला आहे असं कळतांच ताटवाटी घासायला निघणारा साधुबुवा, पोलिसाला दमदाटी करणारा डोमा, गिऱ्हाईकाला आणि व्यापाऱ्याला गंडवीत असतांना पोट जाळण्यासाठीं जिवाचा आटापिटा करणारा आबा,

शिक्यातलं मांस आपोआप खालीं पडलें तर त्यांत जीव आला या कल्पनेनें तें कुत्र्याला टाकणारी आणि त्या खातर नवऱ्याच्या शिव्या व मार खाणारी मैना, साप चावला तर विष भिनून आतां आपण मरणार या कल्पनेनें आपल्या पायाची पांची बोटें कुऱ्हाडीच्या घावासरशीं स्वतःच तोडून लंगडा झालेला आणि त्या जीवघेण्या प्रसंगाचीच नशा पिणारा लंगडा म्हादू, गांवांतल्या मास्तराला परसातल्या भाजीइतकीही किमत न देणारा, आणि त्याने अपमान केला असें मानून त्याला व पोराला पांच पंवरा पायल्यांचं अन्न शिजवलेली परात जेवायला लावणारा नानासाहेब, वैद्य आणि डॉक्टर यांच्यापेक्षां स्वतःला जास्त अक्कल आहे असं समजणारा पर्ण 'कारोगीन कोनाहोय' असं पाव्हण्याला विचारणारा डाक्तर सोमा, कपभर चहांत पुन्हां कपभर पाणी व बकरीचें दूध ओतून देणारा सखाराम, आपले अडकलेले पांचशें रुपये परत मिळविण्यासाठीं पोरीच्या छळाकडे डोळे मिटून घेणारा भीमराव अशा विविध स्वभाव वैशिष्टयांनीं रसरसलेल्या कित्येक व्यक्तिरेखा यांत आहेत. त्यांच्या स्वभावरेखनांत ठोकळपणा निर्माण झालेला नाहीं. त्याच्या व्यक्तिमत्वांतले अनेक थर त्यांत प्रतिबिंबित झाले आहेत.

या सर्व व्यक्तिचित्रांशीं आणि कथावस्तूंशीं एकजीव झालेली भाषाशैली आणि शब्दकला हे शेळक्यांच्या लेखणीचे अनन्यसाधारण सामर्थ्य आहे.

शेळक्यांच्या कथा वाचल्यानंतर सामान्य वाचकाला देखील आशयाशीं एकरूप होणारी शैली म्हणजे काय याचा अर्थबोध व्हावा इतकी ती प्रभावी आहे. त्यांच्या कथा वऱ्हाडी बोलींत लिहिलेल्या आहेत. क्वचित् कांहीं ठिकाणीं होणारा अतिरेक सोडला तर बोली भाषा आणि लेखन यांचा तोल शेळक्यांनीं साधला आहे. भाषाकोविदांनींही अभ्यास करावा अशी वऱ्हाडी बोलीचीं वैशिष्टयें शेळक्यांच्या लेखणींत सुस्पष्टपणें आढळतात.

चोचकारणे, सूरफरफटणे, यासारखे शब्दप्रयोग तर आहेतच पण त्यांची प्रतिभासृष्टि देखील त्याच्या प्रतिभेची आणि सूक्ष्म निरीक्षणाची साक्ष देते. वानगीदाखल कांहीं उदाहरणें देतो.

'पत्यांसोबत काल परवा अमरावतीच्या थिएटरात पाहिलेल्या तमाशातल्या नाचणाऱ्यांचे अवयव अवयव त्यानी पिसावयास घेतले होते' (दाद) रंधा लाकडाची पाठ ओरबाडू लागला (साधुबुवा) बच्चूच्या तोंडांतल्या पानांचं पिंक ओठांवर समत भेलकंडत होतं. (जाणीव). तिचं तारुण्य सीलबंद डब्यांतल्या द्रवपदार्थासारखं डबडबतं. (वडवानल)

अशा एक ना दोन कित्येक ओळींतून शेळक्यांची प्रतिभासृष्टी, त्यांची कल्पकता, आणि वास्तवाशीं एकजीव होऊन आकारलेली शब्दकला यांचा प्रत्यय येईल. त्यांच्या निसर्गवर्णनांत देखील कारुण्याची गहिरी छाया आढळते. "सावघवणें" "गारवणे" यासारखे 'नामधातू क्वचित दिसतात–ती क्षुल्लक बाब आहे.

प्रादेशिक वाङमयाचा कस आतां उताराला लागलेला असतांनाही कसदार आणि दर्जेदार प्रादेशिक कथांचा संग्रह वाचल्यानें वाङमयीन समाधान वाचकांना प्राप्त करून देण्याचें मोठें सामर्थ्य या पुस्तकांत आहे.

**–श्रीपाद भागवत**

[ **वागनी** ले. उद्धव ज. शेळके. पाप्युलर प्रकाशन मुंबई. किमत ६ रु. ] ☆☆

## मुक्त छंदानें पिचलेली 'बांसरी'

**बांसरी** हा अनंत कदम यांचा पहिलाच काव्यसंग्रह. मुक्तछंद हा मुक्तहस्तानें वापरावयाचा छंद आहे अशी कल्पना करून घेऊनच बांसरींतील पुष्कळशा कविता मुक्तछंदांत लिहिल्या आहेत. कवीच्या नांवापुढील 'एम. ए.' हे पदवीचे शेपूट नीट लक्ष देऊन वाचले नाहीं तर संग्रहांतील पुष्कळशा कविता एखाद्या अगदीं–सामान्य शाळकरी पोराच्या अवस्थेंतील वाटतात. संग्रहांतील पुष्कळशा सामान्य कविता वाचून त्यांतील होतकरूपणा लक्षांत येतोच. परंतु अशा कवितांचा संग्रह काढण्याचे धाडस दाखविणाऱ्या प्रकाशकाबद्दलहि बराच 'आदरभाव' निर्माण होतो. संग्रहांतील बऱ्याचशा कविता मालगाडीच्या डब्यांसारख्या लांब लांब असून मुक्तछंदांत फरफटत नेल्या आहेत. चवसष्ट पानांच्या या पुस्तकांत एकूण अडतीस कविता असून सुरवातीलाच आवारा चुकांचे एक शुद्धिपत्र (मुखशुद्धीसाठीं) छापण्याचा एक झकास प्रयोग प्रकाशकानी केला आहे. ( या व्यतिरिक्त ज्या असंख्य चुका पानोपानीं विखुरल्या आहेत त्या शोधण्याचे काम रसिक वाचकांनी स्वतः करावयाचे आहे.)

दलितांविषयींची तळमळ, श्रमणाऱ्याविषयीची सहानुभूति–यांच्याबरोबरच 'गाणारे पक्षी' – वृण – पर्ण – वृक्ष – दऱ्या खोऱ्या या साऱ्यांनाच कवीनें कवितेसाठीं आपल्या वेठीस धरले आहे.

**द्वेषाचा जळणारा पू दुर्गंधी**
**वाहतो जयांतून सतत—**

अशा सारखी बेंगरूळ रचना केवळ मुक्तछंदाच्या आणि दुर्बोधतेच्या अतिरेकी हव्यासानेंच केली आहे असे उघडपणें जाणवते.

**आपण दोघं किती हिंडलों**
**हिरव्या रानावनांतून**
**वैशाखाचा महिना जळते उन्ह**
**त्या उन्हाची कूणास हुोती पर्वा ?** हा दरी या कवितेंतील — एक काव्याचा मासला. ही सारीच कविता एक पोरकट— थिल्लरपणाचा नमुना म्हणून लक्षांत रहाते. (कवि येथें पार घसरल्यानेंच या कवितेला दरी हे नांव समर्पक वाटते. )

'प्रगत जाहला म्हणती मानव' "कशास स्वर्ग" या कविता मात्र इतर कवितांच्या मानानें जरा उजव्या वाटतात.

**गाणे गा अश्रूंचे**
**गाणे गा व्यथांचे**
**गाणे गा क्षतांचें**

**जीवंत प्रेतांचे** ही बुलबुलाला केलेली विनवणी देखील चिंतनीय आहे. 'बदलला काळ' ही कविता तर 'अहो जग पुढे गेले' या श्री. मंगेश पाडगांवकरांच्या गाजलेल्या कवितेची (भ्रष्ट) नक्कल आहे यांत कधींच शंका नाहीं! त्यांतील उतारे देण्याचा मोह अनावर होत असला तरी जवळजवळ संपूर्ण कविताच "नक्कल" असल्यानें ती येथें उद्धृत करणें केवळ अशक्य आहे.

मात्र या संग्रहांतील काहीं छोटया छोटया कवितांतच कदम खऱ्या अर्थानें काहीं तरी सांगून जातात.....

**डोळ्यांतील डोहीं तुझ्या**
**जेव्हां जेव्हां बुडतो मी**
**माझा मी उरत नाहीं तेव्हां जग-द्रुमी**
(तुझी ओढ)

किंवा:–

**चालायचे एकटयानें**
**रखडत ठेंचाळत**
**मरायचे एकटयानें**
**झगडत रक्ताळत** (मन वांकले वांकले)

–अशा कवितांतून – त्यांना जे सांगायचे असते ते स्वच्छ आणि नितळपणें स्पष्ट केले जाते. कदम यांच्या कवितेचे यश तिथेच कुठेतरी लपलेले आढळते. मुक्तछंदाच्या प्रलोभनांतून ते बाहेर पडतील आणि असली हळूवार कविताच प्रयत्नपूर्वक जगवतील तर पुढल्या संग्रहांत त्यांच्याकडून अधिक यशाची अपेक्षा करणे वावगे ठरणार नाही.

**–सदाशिव करंदीकर**

[**बांसरी** कवि अनंत कदम, एम. ए. मुद्रक प्रकाशक:–परव ब्रदर्स, मुंबई नं. ४ किमत दोन रुपये. ] ☆☆☆

( पान १५ वरून )

म्हणून विचारतोस. तुझं मुळीं माझ्यावर प्रेमच नाहीं!" लागली रडायला. आतां काय करावं? खंड्यानं कॉटखालून गुर्र गुर्र केलं नि माझ्याकडे बघितलं. तो सरळ सरळ सांगत होता:–

"बाईला अश्रू ढाळायला लावणं हें आपल्याला नाहीं बुवा पसंत." मला तरी कुठं पसंत होतं. पण करायचं काय? तिला सगळं सांगावं तर अरविंदाची धमकी, "मी तुमच्याजवळ बोललोय् हें तिला कळतां कामा नये, नाहीं तर....." 'नाहीं तर....'ची कल्पना मी डोळ्यांपुढें आणूं शकत नव्हतो. म्हटलं आपणच उलटा पवित्रा घ्यावा.

"सीमा, बैस, आलीच आहेस तर!" मी नाटकीपणानं म्हणालो, "पण कांहीं उपयोग नाहीं!"

"म्हंजेऽऽ!" ती एकदम उसळून ओरडली, "मी कांहीं तुझ्याकडे मागायला आल्येय् कीं काय?"

"नाहीं, पण संपलं!" मी.

"काय संपलं?" सीमा.

"सारं संपलं!!! मी."

"काय सारं संपलं?" सीमा.

"आपलं प्रेम वगैरे!" मी.

"मी नाहीं समजलें. आणि चेष्टा पुरे हं, असली चेष्टा मला नाहीं आवडत." सीमा.

"चेष्टा कोण करतोय्. तुझ्या माझ्या आवडीनिवडींत जमीन-अस्मानाचा फरक आहे!" मी

"तुला कुणीं सांगितलं?" सीमा.

"सांगायला कशाला पाहिजे. विचार करतां करतां सहज जाणवलं. तुला आवडणारा पुरुषोत्तम म्हणजे दारासिंग-कम्-क्ले कॅशिअस्-कम् पिस्तुलबाज्-कम्-ज्युडो स्पेशॅलिस्ट आहे हें मला निश्चितपणें माहीत आहे.............."

"तूं आतां काय शब्द उच्चारलेस त्यांतल्या एकाचाहि अर्थ मला माहीत नाहीं."

"सीमा वेड घेऊन पेडगांवला जाण्यांत काय अर्थ? लहानपणापासून असल्याच एका महापुरुषावर तुझं प्रेम आहे आणि तुझ्या आई-वडिलांचीहि त्याला संमति आहे!"

"सुधीर! आतां मात्र तूं माझा अपमान करतोयस्!"

"तो कसा काय बुवा?" मी अगदीं निरागसपणें विचारलं.

"दुसऱ्यावर प्रेम असतांना मी तुझ्या बरोबर हिंडले आणि परवां सिनेमाला आले ती काय केवळ flirtation म्हणून काय रे? तुला त्याच दिवशीं मी म्हटलं होतं ना मी तुझ्याबरोबर सिनेमाला येते ह्याला खोल अर्थ आहे. त्या वेळेला नंदीबैलासारखी मान हलवून नि डोळे मिचकावून तुलाहि तो मान्य असल्याचं कां सूचित केलं होतंस? माझ्या भावना अशा पायदळीं तुडवण्याइतक्या स्वस्त नाहींत, समजलं ना? आवडीनिवडींतला फरक तुला सहज सुचला काय रे?"

"सीमा, सीमा आतां तुला कसं सांगूं? माझं तुझ्यावर खूप खूप प्रेम आहे ग. पण.....पण....आपल्याला 'कांहीं अपरिहार्य कारणास्तव' लग्न करतां येणार नाहीं.

"असं काऽऽय? सीमा म्हणाली, "तुझं तें 'अपरिहार्य कारणास्तव' ठेऊन दे कॅज्युअल लीव्हच्या ॲप्लिकेशनमध्यें लिहिण्यासाठीं. मी माझ्या भावनांशीं असा कुणाला खेळ करूं देणार नाहीं. परवां सिनेमा पाहून गेल्यावरोबर मी आईला सांगूनसुद्धां टाकलं....."

"काय?" मी विचारलं.

"माझं लग्न ठरलंय् म्हणून."

"कुणाशीं?"

"क्युण्याशी? काळ्या कुत्र्याशीं! इतकं झालं तरी विचारायला कांहीं वाटतसुद्धां नाहीं!" सीमा दांतओठ चावत बोलली.

"सीमा ग, हिंदी सिनेमाच्या भाषेंत सांगायचं म्हंजे 'सीमा, सीमा, तुम मुझे समझनेकी कोशिश करो!'" मी म्हणालो.

"आणि त्यांच भाषेंत उत्तर द्यायचं म्हंजे 'सुधीर सुधीर, तुम मुझे समझानेकी तो कोशिश करो!' काय? आपलं उठलं भल्या पहांटे नि मोडलं लग्न. हें नाहीं चालायचं, बच्चंजी! तुला कांहीं अडचण असेल तर सांग. आपण पापांना विचारूं या."

"नको नको." मी विव्हळलो.

"मग काय तें खरं खरं सांग, टाळाटाळ नको!"

"अगदीं खरं सांगतो, 'तुझ्याशीं लग्न दूरच. मी नुसतं बोललो तरी माझ्या हाडांचा भुगा, चूर्ण, पावडर किंवा चुराडा करायचं आश्वासन एकानं मला दिलंय्."

"आणि तूं घाबरलास! हात्तुझी! काय मोंगलाई आहे काय म्हणावं. सरळ पोलिसला कळव."

"पोलिसला कळवून काय उपयोग? हा भुगा सुधीर कुलकर्णी नांवाच्या 'इसमाच्या' हाडांचा आहे असें परिस्थितिजन्य पुराव्यावरून सिद्ध होत आहे, असा पंचनामा करून पोलिस मंडळी माझी केस फाईल करून टाकतील. मग कसलं लग्न नि कसलं काय? त्यापेक्षां माझ्यावर तुझं प्रेम आहे म्हणूनच सीमा मला तूं विसरून जा आणि कुठेंही अस पण सुखी अस."

"हें पहा सुधीर, तुझं माझ्यावर प्रेम नसेल तर प्रश्नच नाहीं. मला इतके दिवस नुसती झुलवलीस असं मी समजेन आणि राहीन. पुढल्या वेळेस ताकहि फुंकून पिईन. पण माझ्यावर भलता आरोप करूं नकोस. माझा विश्वासघातच तुला करायचा असला....

"सीमा पुरे पुरे! अगदीं गैरसमज करून घेऊं नकोस ग. माझं तुझ्यावर भयंकर प्रेम आहे, अगदीं प्राणापलिकडे. पण परिस्थिती अशी आल्येय् बघ....." मी काकुळतीला येऊन म्हणालो.

"परिस्थिति मी ओळखत नाहीं. तुझं माझ्यावर प्रेम आहे ना?"

"हो" मी.

"तुझी ती परिस्थिति वजा केली तर माझ्याशीं लग्न करायची तुझी इच्छा आहे ना?" सीमा.

"हो!! अगदीं मनापासून."

"मग हें लग्न होणारच!" सीमानें जाहीर केलं.

"होणार?" मी पुन्हां विव्हळलो.

"हो." सीमाचा निश्चय.

"सीमा, अनुगमनाची तयारी ठेव, रजपूत रमणींप्रमाणें!, कारण लवकरच..."

"ए ! मूर्खासारखं बडबडू नकोस आतां. तुला कुणी धमकी दिल्यैय् त्याचा आपण बरोबर बन्दोबस्त करूं या. माझा एक आतेभाऊ आहे त्याला मी पाठवून देते. तो बरोबर पाहून घेईल." सीमा घाईघाईनें बोलूं लागली.

"आते भाऊ ! ! !" म्हणून मी जागच्या जागींच उडालो, "म्हंजे...."

'अरविंद देशपांडेच का?' असं मला विचारायचं होतं. पण एवढा मोठा आवंढा गिळावा लागला कीं शब्दच फुटला नाहीं. आणि सीमाला तर अशी घाई सुटली होती.

"आतां अगदीं बोलूं नकोस. जाते बरं कां. लवकरच मला येऊन भेट. आतां शक्य तों जवळचा मुहूर्त धरायचा. आणि ती निघूनसुद्धां गेली. माझे गुडघे एकमेकांवर आपटूं लागले. 'मुहूर्त कसला धरताय् कर्माचा?' मी मनाशींच म्हणालो आणि कॉटवर कोसळलो. इतका वेळ अस्वस्थ होऊन बसलेला खंड्याहि बाहेर गेला. गल्लीच्या तोंडापाशीं असलेल्या आवडत्या टेलिफोनच्या खांबाकडे तो गेला असावा. असा किती वेळ गेला कुणास ठाऊक ? पांच मिनिटं असतील किंवा तासदीड-तासहि असेल. घरांत एकाएकी काळोख झाला म्हणून मी दाराकडे पाहिलं. सबंध दार अडवून अरविंद देशपांडे उभा होता. त्याचा उजवा हात खिशांत होता. मी कॉटवर पडल्यापडल्याच दोन्ही हात वर केले म्हटलं, डोळ्यांच्या मधोमध नेम धरून हा एकच गोळी झाडणार कीं डिटे-क्टिव्ह स्टोरींतल्या गुन्हेगाराप्रमाणें "I will shoot you where it will hurt most" अशी प्रस्तावना करून आणखी कुठें गोळी घालणार. कांहीं असलं तरी आपण हात वर केलेलेच बरे. उजव्या खिशांतून त्यानें हात बाहेर काढला नि मी गप्कन् डोळे मिटले. कांहीं सेकंदांनीं काडी ओढल्याचा आवाज आला म्हणून मी एक डोळा उघडला. शांतपणें सिगरेट् पेटवून अरविंद देशपांडेनें एक भारी दम मारला होता. त्याच्या नाकातोंडांतून आणि कानांतूनहि धुराचे लोट बाहेर आले आणि त्यां मागून शब्द---

"हल्लो, कुलकर्णी! आपल्या भेटीचा सुयोग इतक्या लवकर येईल असं वाटलं नव्हतं!" तो माझ्यासमोर येऊन उभा राहिला. मी मनांत चांचपडून पाहिलं. पण प्रसंगाला साजेसे शब्दच मला आठवले नाहींत. मी आपला गप्पच राहिलो. अरविंद देशपांडेनें घरभर एक नजर फिरविली आणि संतोषदर्शक मान हलवून म्हटले. "छान!" 'काय छान ?' हा प्रश्न माझ्या चेहऱ्यावर उमटला असावा. कारण अजून प्रत्यक्ष शब्द उच्चारण्याची ताकद जिभेंत आली नव्हती. माझ्या चेहऱ्यावरचा प्रश्न वाचून श्री. देशपांडेनेंच त्याचं उत्तर दिलं.

"घरांत कांच-सामान फारसं नाहीं, तेव्हां मोडतोड कमीच होईल, बरोबर ना?" अजूनहि त्याच्या प्रश्नांना उत्तरं देण्याइतका उत्साह माझ्या अंगांत आला नव्हता.

"घरांत आणखी कोणी ?" त्यानें पृच्छा केली पण माझी अवस्था बघून स्वतःच आंतल्या खोलींत नजर टाकली आणि पुनः समाधान व्यक्त केलं.

"हेंहि बरं. कटकट नको! अशा वेळीं नातेवाईक मंडळींची फार अडचण होते. आपल्या प्रिय माणसांची हाडं मोडत असतांना. येणारा आवाज कानांना फारसा गोड लागत नाहीं. बरं मग श्री. कुलकर्णी, आतां आपण मुख्य कार्याला हात घालूं या. तुमची तयारी



**श्री. जयरामभाई डायाभाई चौहान ( बिटकोशेठ )**

# अंगभूत चांगुलपण

**चांगुलपण** हें अंगभूत चांगलेपणावरच अवलंबून आहे. जात, धर्म, वय, लौकिक, शिक्षण, बंगला, मोटर, बाकीची श्रीमंति, अंगभूत सौंदर्य वा कुरुपता ह्यापैकीं कशावर तें अवलंबून असत नाहीं. कांहीं वर्षांपूर्वींपर्यंत आपल्याकडे साहित्यांतून माणसाचें जें चित्रण केलें जाई तें 'नेहमी' एका विशिष्ट प्रकारचें असे. गरीब हा नेहमी सज्जन, सालस, भोळाभाबडा, गुणी दाखविलेला असे आणि श्रीमंत हा नेहमीं बनेल, कावेबाज, दुष्ट, अमानुष असा रंगविलेला असे. पण तो तेव्हांही तसा नव्हता आणि आजही नाहीं. माणूस चांगलाही आहे आणि वाईटही आहे. केवळ चांगला वा वाईट नाहीं. तो गुणी आहे आणि दोघांनीं लडबड-लेलाही आहे. आपल्या भोंवती अशीं कितीतरी माणसें वावरतांना दिसतात कीं जी श्रीमंतही आहेत आणि चांगलीही आहेत. तशीच गरीब असूनही बदमाष आहेत. तेव्हां अंगभूत चांगले वाईटपण मानणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें.

नाशिकला तुम्हीं कधीं गेलांत तर स्टेशनवरून गांवांत जातांना एक सिनेमा थिएटर लागेल. त्या थिएटरचें नांव आहे "**बिटको टॉकीज**" नांव जरा विचित्र वाटेल. पण त्या नांवानें ओळखला जाणारा माणूस विचित्र नाहीं. त्याचें कर्तृत्वही मोठें आहे. "बिटको शेठ" ह्या नांवानें ओळखला जाणारा हा माणूस मनानें मोठा आहे. आणि तो "श्रीमंत"ही आहे. "बिटको शेठ" हें आपलें प्रेमाचें नांव ! तें इतकें लोकप्रिय झालें आहे कीं, त्यांचें खरें नांव पुष्कळांना सांगावें लागतें. खरें नांव आहे **जयरामभाई डायाभाई चौहान**, सोळा जानेवारी १९६५ ला त्यांच्या वयाची साठी पूर्ण झाली. पण बुद्धि नाठी न झाल्याबद्दल व साठी नंतरही तरुणांच्या तडफेनें हा चांगला माणूस कार्यरत आहे ह्याबद्दल त्यांचा भारताचे "तरुण" संरक्षणमंत्री यशवंतराव चव्हाण ह्यांच्या अध्यक्षतेखालीं सत्कार करण्यांत आला. शंभर रुपयाच्या भांडवलावर "उद्योगपति" होतां येते ह्या गोष्टीवर आपल्या विश्वास बसतो ? पण मानवी बुद्धि आणि मानवी परिश्रम ह्या दोन्हींच्या मिश्रणांतून जो परिस उत्पन्न होतो त्याला ही सुवर्ण किमया करतां येते. "बिटको शेठ" ह्या माणसाजवळ हा परिस आहे. तो त्यांनीं स्वतः सिद्ध केला

आहे. मध्यप्रदेशांतील 'कोसा' गांवीं त्यांचा जन्म झाला. वडील कॉन्ट्रॅक्टर होते. पुढें विडीचा कारखाना काढला. फायदा नाहीं म्हणून स्टेशनरीचें दुकान काढलें. जयरामभाईंनीं व्यवसायाची आद्याक्षरें त्या दुकानांतच गिरविली. त्यांचेशिक्षण इंग्रजी ५ वी पर्यंत झालें. १९ व्या वर्षी लग्न. विसाव्या वर्षी वडिलांचा मृत्यु झाला. जयरामभाई नागपूरला गेले. तेथें अवघ्या १०० रुपयांच्या भांडवलावर त्यांनीं गंध, हेअर ऑईल वगैरेचा धंदा सुरू केला. पण प्रकृति बरी राहीना. म्हणून वैद्यकीय सल्ला मानून ते नासिकला १९२५ मध्ये आले. त्याच वर्षी त्यांनीं कारखाना सुरू केला. १९२७ सालीं नासिक-रोडला जागा मिळाली व त्यांनीं व्यवसायाचा सारा पसारा नासिक-रोडला आणला. झेकोरिन, मलेरिया मिक्श्चर, ब्राह्मी तेल या वस्तूं-पासून त्यांनीं सुरुवात केली. आणि नंतर **बिटको** टूथ पावडर, ग्राइप मिक्श्चर तयार करण्यास सुरुवात केली. त्यांनीं त्यांना असामान्य यश मिळवून दिलें. '**बिटको केमिकल वर्क्स**' ह्या कारखान्यांतल्या ह्या दोन गोष्टींना आशिया आफ्रिकेंतही मागणी आहे. देवाधर्मावर जयरामभाईंची खूप श्रद्धा असल्यानें दातृत्व त्यांच्या ठिकाणीं भरपूर आहे. शाळा कॉलेजांना त्यांचा उदार आश्रय लाभला आहे. वयानें वार्धक्याचा शिक्का त्यांच्यावर मारला असला तरी वृत्तीनें आणि धडाडीनें ते आजही तरुणच आहेत. १६ जानेवारीला नामदार यशवंतराव चव्हाण, नाईक यांच्या उपस्थितींत त्यांचा एकसष्टी समारंभ थाटांत साजरा झाला. तें दृश्य मी डोळ्यानें पाहिलें आणि ह्या माणसाचें मोठेपण हें ह्या महाराष्ट्राचें व देशाचें वैभव ठरो ही भावना शब्दांतून उत्स्फूर्तपणें प्रगटली त्या भावनेचाच हा प्रगट उच्चार! आपलेही सूर ह्यांत मिसळून जावेत ह्या भावनेनें केलेला!!

**—संपादक**

---

आणि संमति मी गृहीत धरतो," म्हणत त्यानं आपल्या बाह्या नीट फोल्ड करून कोपराच्या वर सरकवल्या. त्यांतून त्याच्या दंडाचं झालेलं ओझरतं दर्शन भयंकर होतं. 'आपण पाणीसुद्धां मागणार नाहीं' हें त्याचं पूर्वीचं विधान मला मुळींच अतिशयोक्त वाटलं नाहीं.

"आपण उठून उभे राहिलांत तर अधिक बरं होईल. पडलेल्यावर हात टाकायला मला तरी कसंसंच वाटतं. शिवाय आपण उभे राहि-लांत म्हणजे माझे प्रहार चुकवण्याचा थोडासा प्रयत्न तरी आपल्याला करतां येईल. मारणारा हात माझा असल्यावर तें फारसं शक्य नाहीं म्हणा. पण... उठा ऽऽ!" म्हणून त्यानं माझ्या शर्टची कॉलर धरून मला चक्क उचललं, मी काकुळतीला येऊन म्हटलं,

"प्लीज्, मिस्टर देशपांडे....."

"छे छे छे छे! मी तुम्हांला अगदीं स्पष्ट शब्दांत वार्निंग दिली होती तरी तुम्ही......"

"अहो ऐकून तर घ्या. सीमाच इथं आली. मी तर गेले दोन दिवस घराबाहेर पडलेलो नाहीं."

"आणि ती इथं आली म्हणून तुम्ही तिला सगळं सांगून पुन्हां मलाच माझा बंदोबस्त करण्यासाठीं बोलवायला सांगितलंत वा ऽऽ! हा-हा.. हा.. हा... हा......... " तो मेघगर्जनेप्रमाणें हंसला.

"नाहीं हो, तीच म्हणाली....."

"छा छा छा छा, तीच म्हणाली-बिणाली कांहीं चालायचं नाहीं. एकदां वॉर्निंग दिल्यावर मग दयामाया नाहीं. आज मला वेळ भरपूर आहे तेव्हां ज्युडोचे गंमतीदार प्रयोग मी तुम्हांला करून दाखवतो. पहिल्याप्रथम तुमच्या शोल्डर-ब्लेडजवळची शीर दाबून मी तुमचा रक्तप्रवाह कसा अडवून धरतो तें बघा हं. खूप दिवसांत मला प्रॅक्टि-सची संधि मिळाली नव्हती."

त्यानं माझा शर्ट बाजूला करून शोल्डर ब्लेडजवळ चांचपा-यला सुरुवात केली आणि मरण 'अति समीप ऽऽ' येऊन मला 'साव-बाऽऽन' म्हणतय् अशा समजुतीचा मी कांहींतरी आवाज केला. ती किंकाळी असेल, घशांतली घरघर असेल, वातांतल्या माणसाचं बर-ळणं असेल. कांहींहि असेल. पण त्याचवेळीं दारांतून आंत शिरणाऱ्या खंड्याला तें फारसं आवडलं नसावं. मेंढीला दांतांत पकडणाऱ्या लांड-ग्याची आठवण झाल्यासारखा त्याच्या डोळ्यांत खून चढला आणि त्यानें गुरगुर करून अरविंद देशपांडेवर झडप घातली. माझ्या शोल्डर-ब्लेडजवळचं त्याचं संशोधन संपत आलेलं असावं. पण तें तिथेंच सोडून त्यानें एका उडींत राइटिंग टेबल आणि दुसऱ्या उडींत सीलिंगवर डोकं शेकवून घेत कपाटाचा वरचा भाग गांठला. काय झालं हें दोन क्षण माझ्या लक्षांतच आलं नाहीं. आपला रक्तप्रवाह थांबणार म्हणजे नक्की काय होणार ह्या संबंधींचा अंदाज करण्यांत माझी सगळी विचारशक्ति गुंतलेली होती. पण दोनच क्षणांत मला एकंदर परिस्थितीची योग्य ती जाणीव झाली. कपाटाच्या खालीं खंड्या दांत दाखवीत गुरगुरत होता आणि त्याच्या प्रत्येक गुरगुरण्या-सरशीं अरविंद देशपांडेचा चेहरा अत्यंत रसाळ 'गिलोटिन चॉप्' शरी-रांतल्या आठहि मर्मस्थानांवर एकसमयावच्छेदेंकरून पडत असल्या-प्रमाणें उतरत होता. इतका घाबरलेला चेहरा मी साऱ्या जन्मांत कधीं पाहिला नव्हता. "असं आहे तर एकंदरीत." मी स्वतःशीं म्हणालो, हा ह्या सुपरमॅनचा वीक पॉइंट! मघाशीं माझ्या शोल्डर-ब्लेडच्या संशोधनासाठीं त्यानें बाजूला केलेली शर्टाची कॉलर मी नीट केली. सगळीं बटनं लावली. केंसांवरून कंगवा फिरवला आणि पुन्हां कॉटवर बसत अरविंद देशपांडेकडे धीम्या नजरेनं पाहिलं.

"तो...तो...तो कुत्रा चावत नाय ना?" 'ह्यो ह्यो ह्यो पावणा वरा दिसतो' त्याच्या चालींत त्यानं प्रश्न केला.

"नांव खंड्या. परिचय असलेला बरा." मी खंड्याला इंट्रोड्यूस केलं, "धनगरी कुत्रा आहे. मुंबईत आणल्यावर अनेक मित्रांनीं मला सांगितलं कीं ह्याचं नांव बदलून टॉमी, टायगर किंवा किमान पक्षी मोती ठेवा. पण मी त्याचं जुन्या धन्याच्या वेळचंच नांव कायम ठेवलं. तुम्हांला कसं काय वाटलं?" कुत्र्यावरची आपली नजर न काढतां त्यानं विचारलं—

"आं?"

"नाहीं, खंड्या हें नांव गांवढळ वाटलं तरी मला आवडतं, तुम्हांला कसं काय वाटलं, तें विचारलं हो मी!" मी पुन्हां आपल्या प्रश्नाचं स्पष्टीकरण केलं.

"ठीक आहे!" त्यानं चांचरत उत्तर दिलं.






"ठीकच?" मी जरा नाराजीनं विचारलं.

"नाहीं म्हणजे उत्तम, सर्वोत्कृष्ट! असं नांव माझ्या ऐकिवांत नव्हतं."

"थँक्यू!"

"पण, कुलकर्णी तो कुत्रा, नव्हे खंड्या चावणार नाहीं ना?"

"हां, आतां आपण त्या प्रश्नाकडे वळूं या. खरं सांगायचं म्हंजे, खंड्या नुसता चावणारच नाहीं तर तुमचे लचके लचके तोडून तुम्हांला मारील, स्वतःचा जीव गेला तरी! मागें एकदां एक चोर शिरला होता माझ्या घरांत, त्याची मांडी खंड्यानं अशी फोडलान् कीं त्याला अठ्ठावीस इंजेक्शनं घ्यावीं लागली. नेहमींचा चौदा इंजेक्शनांचा कोर्स पुरला नाहीं! आतां बोला" संभाषणाला प्रेमळ घरगुती वळण देत मी मी म्हणालो.

"अयाई ग! " देशपांडे विव्हळला.

"आणि मग तो धंद्यांतून निवृत्तच झाला." मी.

"कोण? "माझ्या बोलण्याकडे लक्ष नसल्यानं अरविंद देशपांडेनं प्रश्न केला.

"चोर हों!" मी सांगितलं.

"हां हां!" तो म्हणाला. शेपटी ताठ, कान ताठ आणि डोळे गरगरा फिरवत खंड्या कपाटासमोर नाचत होता.

"अशा खंड्याच्या कितीतरी गोष्टी आहेत. पूर्वी त्यानं एकट्यानं एकदां रानडुक्कर मारला होता. सांगूं कां तो कथाभाग?"

"नको नको. कुलकर्णी माझ्यावर दया करा. मला जाऊं द्या. खंड्या न चावतां!"

"जाल हो, ही आपली दुसरीच तर भेट. बसूं जरा गप्पा मारीत मजेशीर." म्हणून मी त्याला खंड्याचे आणखी पांच सात किस्से सुनवून दिले. आलेल्या पाहुण्याचं मनोरंजन तर केलंच पाहिजे.. शेवटीं त्याला हेंहि सांगितलं कीं खंड्याचं घ्राणेंद्रिय भयंकर तिखट आहे, तुमचा वारा तो आतां कधींहि विसरणार नाहीं नि माझा हुकूमच होता...वगैरे वगैरे." त्या महापुरुषाची बोबडी वळली होती. इतकी कीं दोन वर्षाच्या पोरानं नुसती टिचकी मारली असती तरी तो खाली कोसळता. मग खंड्याच्या अध्यक्षतेखालीं आमची एक छोटीशी सभा झाली. कपाटावर बसल्या बसल्या अरविंद देशपांडेनं मला जें जें पाहिजे होतं तें तें लिहून दिलं नि खालीं आपली सही ठोकली. ह्यापुढे मला कोणत्याहि प्रकारें त्रास दिला नाहीं तर त्याच्या करारपत्रांतला मजकूर कोणाला न कळवण्याचं वचन मी त्याला दिलं. मग खंड्याला मी सांखळी बांधली. देशपांडे घाबरत घाबरत खालीं उतरला.

"चहा-बिहा घेऊन जा कीं आल्यासारखे" मी भावी गृहस्थधर्माची आठवण ठेऊन सांगितलं.

"आज नको, पुन्हां केव्हांतरी!"

"पण लग्नाला अवश्य यायचं बरं कां, लग्नमंडपांत खंड्या नसेल."

"बरं जरं! निघूं आतां?... ..."



## विश्वविद्यालयीन विनोद !

### पिकनिक! पिकनिक!!

'पिकनिक'ला कॉलेज जीवनांत केवढें महत्व ! पण एका बहाद्दरानें पिकनीकची नोटीस लावली ती खालीलप्रमाणें होती.

'ज्यूनिअर बी. ए. ची सहल येत्या रविवारीं पवई लेकला जाईल. विद्यार्थी विद्यार्थिनींनीं कुठल्यातरी गाडीनें तेथें जावे. जातांना वाटल्यास डबे न्यावे. भूक असल्यास खावे. वर्गांतल्या भेटतील त्या मुलांशीं बोलावे–सुचतील ते कार्यक्रम करावेत – व कुठल्या तरी गाडीनें घरोघर जावे. बस्स ! येवढेंच !

☆ ☆ ☆

### तें मीच सांगूं ?

एका प्राध्यापकांनी पहिल्याच तासाला विद्यार्थ्यांना गंभीरपणें सांगितलें :

'हें पहा, विद्यार्थ्यांनो – माझ्या तासाला हजर राहण्याला मी महत्व देत नाहीं. वर्गांत लक्ष द्यावं हीच अपेक्षा !'

'कुणाकडे ?' एका वात्रट मुलानें मधेंच विचारले.

'आतां तें सुद्धां मीच सांगायला हवं ?'

प्राध्यापकांनीं तितक्याच मिष्किलपणें त्याला विचारलं.

–माधव अत्रे

"सीमाच्या बाजूचं बोलावणं असेलच म्हणा तुम्हांला... पण आमच्याहि बाजूचं विसरूं नका. जेवायलाहि थांबायचं बरं कां?"

"अवश्य" म्हणत खंड्याकडे पहात तो निघून गेला.

सीमाला जेव्हां मीं ही हकिगत सांगितली तेव्हां तिची मोठी करमणूक झाली.

"पण काय ग!" शेवटीं मी विचारलं, "हा एवढा राक्षस, कुत्र्याला कसा भितो नि त्याच्याजवळ पिस्तुल नसतंच वाटतं?"

"अरे बाबा तो चार वर्षांचा असतांना त्याला कुत्रा चावला होता नि पोटावर इंजेक्शनं घ्यावी लागली होती तेव्हांपासून कुत्रा म्हटला कीं तो भितो" सीमानं सांगितलं.

"आणि पिस्तुल?" पुन्हां मी.

"तूं तरी येडाच आहेस सुधीर! सेक्युरिटी ऑफिसर झाला म्हणून त्याला मिलच्या प्रिमाइसेस बाहेर पिस्तुल मिरवायला परमिट नसतं कांहीं!"

"असं असं!" मी म्हटलं नि सीमाचा हात हातांत घेतला.

●●●

( पान १८ वरून )

कॉलेज मुक्यासाठीं नव्हतं. कॉलेजच्या पोरीसुद्धां त्याच्यासाठीं नव्हत्या. आतां हें पोरींना काय माहीत? त्यांना वाटायचं पोरगं बरं दिसतंय्. स्वभावानं गोड, रूपानं देखणं, बापाचं सोन्याचांदीचं दुकान. जाळ्यांत अडकलं तर वाईट नाही! निदान छबिलदास शाळेच्या पिछाडीच्या गल्लीतील 'कऽकू' उर्फ कमल कुळकर्णीनं असा विचार केला. मुक्या वेदकच्या ती स्वच्छ मागं लागली. कशी आणि कुठवर तिलाच ठाऊक!

व्हायचं काय?

मुक्याला नसंताच त्रास होऊं लागला. नको असलेलं ज्ञान मिळूं लागलं. तो धांवत माझ्याकडे आला. कासावीस होऊन म्हणाला, "वांचव मला. तुझी कमल प्रेमांत पडलीय् माझ्या—"

माझ्या छातींत सुईचे दोन टांके पडले. "कमल—कमल कुळकर्णी? आय् मीन कऽकूऽऽ?"

"हो!" तो उसासत बोलला. आणि धांपा टाकत राहिला.

"मग?" आवाजांत डंख होता. माझा प्रश्न मलाच कडवट लागला.

"पळून जातो झालं कुठंतरी कांहीं दिवस. म्हणजे काय, माझी मलाच खात्री नाहीं रे! ती समोर असली ना कीं कांहीं वेगळेच विचार डोक्यांत येतात. आणि ती समोर नसली कीं, हे वाढतच जातात बघ! बरे नाहींत! दुष्ट, वाईट विचार... लाज वाटते सांगायला. पण इतर पोरींकडे बघतांना असं नाहीं कांहीं वाटत. हें बरं नाहीं. पाप आहे, पाप आहे... कळतंय् मला. पळूनच जायला हवं! नाहींतर माझ्याकडून अनर्थ होईल....कमलचं नुकसान होईल..." मुकुंद केविलवाणा चेहरा करून आपला प्राब्लेम मला समजावून सांगत होता. आपल्या भावना त्याला नीट व्यक्त करतां येत नव्हत्या. शब्द अपुरे पडत. त्यामुळें आणीकच वेदना होत होत्या.

त्याच्याकडून माझ्या कमलचं नुकसान व्हावं हें मला पसंत नव्हतं. मुक्याला मी पळून जाण्याचाच सल्ला दिला. त्यानं कमलला लिहिलेलं पहिलं आणि अखेरचं पत्र न विसरतां तिला पोंचविण्याचं त्याला वचन दिलं. आणि तसं तें पोंचवलंहि. मुकुंदचा जानी दोस्त म्हणून कमलचं माझ्याबद्दल चांगलं मत व्हावं हें अगदीं स्वाभाविक होतं. आणि मग ती माझ्याच प्रेमांत पडली तर तो कांहीं माझा दोष नव्हता. माझ्यापुरतं म्हणाल तर आधींपासूनच मी तिच्यावर प्रेम करीत होतो.

मुक्या वेदक चांगला चारसहा महिने तिकडे गोव्यांत बेपत्ता होता. सोन्याच्या धंद्यावर सरकारी वरवंटा आला आणि त्याच्या बापानं आगगाडीखालीं जीव देऊन स्वत:पुरता आपल्या भवितव्याचा प्रश्न कायमचा सोडवून टाकला. ह्या आकस्मिक धक्क्यानं मुक्यालाहि कमलशिवाय इतर विचार सुचूं लागले. उगाच नाहीं, बापाचं सराफीचं दुकान फुंकून टाकून त्यानं त्याच जागेंत औषधांचं भव्य दुकान थाटलं. मग दोनचार महिन्यांतच त्याला कळून आलं कीं, औषधांचे व्यापारी बनावट माल देऊन लोकांची निघृण फसवणूक करतात. खात्रीचा माल हवा असल्यास स्वत:च औषधांचा कारखाना काढला पाहिजे. कोणातरी गुजराथ्याच्या भागींत त्यानं औषधांचा कारखाना सुरू केला. पण आपला पार्टनर औषधांच्या नांवाखालीं कारखान्यांत कांहीं भलतंच उत्पादन करतो ही, गोष्ट, जरा उशीरांच कां होईना पण लक्षांत आल्यावर मुक्यानं आपली पार्टनरशिप विकून पुस्तकांचं दुकान घातलं. या धंद्यांतहि काळाबाजार आहे हें नजरेस येतांच दुकान बंद करून तो स्वस्त दराच्या पुस्तकांच्या प्रकाशनांत पडला. धंद्यांत नफ्यातोट्याकडे तसं त्यानं कधींच लक्ष दिलं नाहीं. किंबहुना ह्याचा प्रत्येक धंद्रा बुडींतच चालायचा. आणि तरीहि त्याच्या दृष्टीनं तो मस्त चालत होता. नफ्यातोट्याचं गणित खरं म्हणजे धंदा करणाऱ्यानं विचारांतसुद्धां घ्यायचं कारणच नाहीं—गरजच नाहीं. ज्यांना पैसा मिळवायचा आहे त्यांनी ह्या उठाठेवी कराव्यात—मुक्याचं मत होतं. प्रामाणिकच असावं! कारण तसं नसतं तर स्वस्त दरांच्या पुस्तकांच्या नादीं लागून त्यानं सणसणीत मार खाल्ला नसता—

त्याचे एकएक धंदे चालले होते तेव्हांच कधींतरी माझं लग्न झालं. कमल कुळकर्णी-बरोबरच. लग्नाला मुक्या वेदक आला होता. कमलला तो म्हणाला होता, "खऱ्या भाग्यवान्! लाख नवरा मिळाला." त्याच्या बोलण्यांत विषाद नव्हता.

आणि कमलसुद्धां म्हणाली होती, "खरंच वेदक! भाग्य थोर माझं!" तिच्याहि स्वरांत विषाद नव्हता.

मुकुंद वेदकचं मात्र लग्न झालं नाहीं. वय वाढूं लागलं तसे बायकांबद्दलचे त्याचे बरेच गैरसमज आपोआप कमी झाले होते. पोरींबद्दल तसं कांहीं वाटूं लागण्यांत त्याला आतां पाप वाटेनासं झालं. पोरी ह्याच्या मागं लागल्यातरी मुंबई सोडून पळून जाण्याच्या गोष्टी तो काढेनासा झाला. फक्त लग्नाबद्दल मात्र मुक्याच्या टाळक्यांत अजून गोंधळ होता. लग्न लग्नासाठीं करायचं असतं—ह्या कृत्याला अधिक उच्च, उदात्त हेतु असण्याचं कारण नाहीं हें त्याला कधीं पटलंच नाहीं. लग्नाकडे तो एक धर्मकार्य म्हणून बघे. तें पवित्र असायलाच हवं—म्हणजे त्यापासून पुण्याची जोड व्हायला हवी. दोघांपैकी एकाचातरी उद्धार व्हायला हवा. त्याचा स्वत:चा आतां आणखीन् तो काय उद्धार होणार? तेव्हां तो तिचा, ह्याच्या सौभाग्यकांक्षिणीचा व्हायला हवा—मुक्याची अशी ठाम श्रद्धा होती. म्हणूनहि असेल त्याचं लग्न झालंच नाहीं.

तसे चान्सेस आले खूप. आणि हुकले. हातातोंडापर्यंत येऊनसुद्धां लग्नगांठ बसली नाहीं. मुकुंदचा नाइलाज होता, आपल्याकडून त्यानं शिकस्तच केली होती.

आणि हें खोटं नाहीं. त्याचीं सगळींच लफडीं कांहीं मला ठाऊक नाहींत. ठाऊक आहे एकच (त्याच्यावरून बाकीच्यांचाहि अंदाज येईल म्हणा!) मी राहतो त्या बंगल्याच्या तळमजल्यावर एक कुटुंब आहे. पेन्शनर बाप चार वाढलेल्या पोरी, फारसं शिक्षण नसल्यानं

**महत्त्वाची सूचना**

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**










नोकरी नसलेल्या आणि चरितार्थाचं दुसरं साधन नसल्यामुळं राजरोस देहविक्रय करणाऱ्या.

मुक्याला वाटतं ही माहिती मिळाली. ऐकूनच त्याचं हृदय दुभंग झालं. अशांत धाकट्या पोरीला एक दिवस त्यानं पाहिलं. रूपानं सामान्य. पण गरजू होती. चिखलांत रुतलेली गाय, उद्धाराला योग्य. अधिक विचार करायला मुक्या थांबला नाहीं. उठला आणि तडक ह्या धाकटीच्या मागं धांवला. दोघांचं चांगलंच सूत जमलं. तिच्याशीं लग्न करण्याचा विचारहि ह्यानं पक्का केला. तर...तर काय झालं हिच्याहून मोठी, नंबर तीनची पोरगी मुक्याच्या नजरेस पडली. ही वयानं अधिक होती, रूपानं अधिक सामान्य होती आणि म्हणून अधिक 'उद्धारेबल' होती. (शब्द त्याचाच. मराठीवर हीं असलीं कलमं करायचा मुक्याला नाद लागला होता.) आणि झालं ! मुकुंद वेदकचा पक्का झालेला विचार वारगाळला. हें झेंगट असंच सुरू झालं – वाढतच गेलं. पेन्शनरच्या थेट थोरल्या पोरीची ओळख होईपर्यंत. आणि मग गाडी ब्रेकडाऊन होऊन पडली. पुढं रस्ताच बंद होता ! ह्या पोरींची आई वारली होती !

मुक्यानं थोरलीला मागणी घातली आणि हर्षवायु होऊन हाः हाः करीत ती जी बेशुद्ध पडली ती पुन्हा उठलीच नाही. मुक्या मात्र माझ्याकडे येऊन ढळाढळा. रडला. हंबरडा फोडून ओरडला, "मी–मी मारलें रे तिला !"

ह्याच सुमारास स्वस्त पुस्तकांच्या प्रकाशनांत मुकुंदानं दिवाळं काढलं. नादारी जाहीर करून खाका वर कर असा मी त्याला व्यवहारी सल्ला दिला होता. पण त्यानं तो मानला नाही. म्हणाला, "आपला क्रूस आपणच घेऊन चाललं पाहिजे. त्यांतच माणुसकी आहे." परिणामीं, होतं नव्हतं सर्वस्व गमावून मुक्या रस्त्यावर पडला.

आजसुद्धां तिथंच आहे. ह्याचं उठणं-बसणं, निजणं-पडणं सगळं रस्त्यावरच चाललं आहे. तसाच ओळखीचा कोणी माणूस भेटला कीं हाताला धरून त्याला हॉटेलांत नेऊन पोटभर जेवायला घालतो. नाहींतर मुक्या तसाच उपासपोटीं रस्त्यावर भटकत असतो. कपडे मळले आहेत, फाटले आहेत. दाढी, केस वाढले आहेत, तेलपाण्याशिवाय त्याचा अवतार कसासाच दिसतो. आतां मी त्याला ओळखतो म्हणून, नाहींतर रस्त्यावरच्या इतर भिकाऱ्यांत आणि मुक्यांत कांहींच फरक उरलेला नाहीं.

नाहीं कसा ? आहे ! मुक्याला आपल्या परिस्थितीची खन्त नाहीं. आपलं कांहीं वाईट झालं आहे असं त्याला वाटत नाही. तो खूष आहे. सुखांत आहे. असतो आपल्याच तंद्रींत. कुत्र्यामांजराच्या आणि कावळ्या कबुतरांच्या मागं. सांगतो पशुपक्षांची भाषा शिकतोय्. हें आणखीं एक नवीनच वेड त्यानं डोक्यांत घेतलं होतं.

परवांच मुक्या अचानक मला भेटला. वरळी नाक्यावर, त्या जपानी बुद्धमंदिराच्या आसपास. कुत्र्यासारखा हा 'क्यॅव् क्यॅव' करून ओरडत होता आणि रस्त्यावरचीं पोरं त्याला दगड मारीत होतीं.

टॅक्सींतून दिसला हा प्रकार आणि वघवेना, भडभडून आलं मला. टॅक्सी थांबवून मी तडक उतरलों... पोरांच्या अंगावर ओरडून त्यांना पिटाळलं.

"भूः भूः !" मुक्या वेदक माझ्याच अंगावर भुंकत सुटला.

"मुक्या, मुक्या –"

त्याचं भुंकणं चालूच होतं. तो माणसांत नव्हता. किंवा यायला तयार नव्हता.

मी हतबुद्ध झालो, "मुक्या, थोबाड फोडीन हां"—

तसा तो खोः खोः हंसत सुटला. म्हणाला, "सॉरी ! अरे, मला वाटलं कुत्राच. त्यांच भाषेंत बोलत होतो."

"वेडा आहेस !"

"तुलासुद्धां असंच वाटतं ना ? सगळ्यांनाच वाटतं. पण खरं सांगूं, कुत्र्याची भाषा शिकतोय् मी. मांजरांची, कावळ्यांची सुद्धा, पशुपक्षांचीं संभाषणं ऐकायला गंमत येते. कारण माणसांबद्दल यांचं बरं मत नाहीं. आपल्या कपड्यांना हे हंसतात – माणसाला स्वतःची लाज वाटते म्हणून त्याना कपडे, पांघरुणं लागतात अशी हेटाळणी करतात. आमची भाषा त्यांना खोटी वाटते..." वगैरे वगैरे मुक्या उत्साहानं सांगूं लागला.

"बोंब !" मी कपाळाला हात लावला.

कदाचित् तो खरंहि बोलत असावा !

आणि त्याच क्षणीं मला पटलं – यापुढं मुकुंद वेदकला रस्त्यावर एकटा सोडणं हिताचं नाहीं. त्याच्याच. वेडा समजून लोकं त्याला ठाण्याला पोहोंचवतील.

यापेक्षां राणीच्या बागेंत त्याला पिंजऱ्यांत कोंडून ठेवलेला बघण्यांत मला बरं वाटेल ! वर पाटी मात्र हवी. ही अशी-'एक भला माणूस, ए गुड मॅन कम्प्लीटली आणि परफेक्टली.'

●●●

## पु. ल. चा विनोद

### पोरगा फाजील आहे

पु. ल. देशपांडे पुण्याच्या कॉलेजमध्यें शिकत असतांना साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांचें त्यांच्या कॉलेजांत प्रश्नोत्तररुपी व्याख्यान झालें. प्रश्न विचारण्यास सांगितल्यावर पु. लं. नीं विचारलें, 'फेडरेशन म्हणजे काय ?' तात्यासाहेब केळकर यांनीं उत्तर दिलें, 'मुला, फेडरेशन म्हणजे काय, हें कळायला तूं अजून लहान आहेस. आपल्या आटोक्यांतला एखादा प्रश्न विचार.'

पु. लं. नीं ताबडतोब सवाल टाकला, 'अंजिराचा भाव आज काय आहे ?'

तात्यासाहेब मनापासून हंसून म्हणाले, 'मुलगा फाजील आहे!'

### "हमाली दिली ! "

नाटक पाहतांना कोणाची नजर कुठें तर कोणाची कुठें असते, हें सांगतांना पु. ल. म्हणाले, "माझा पुतण्या आमच्या एका कार्यक्रमाला आला होता. कार्यक्रमांत रंगमंचावर पाटीवाला सामान ठेवून गेला. पण त्याला कुणी हमाली दिली नव्हती. कार्यक्रम संपवून घरीं आल्यावर पुतण्या मला म्हणाला, 'त्या पाटीवाल्या हमालाला तुम्ही पैसे कुठें दिलेत ? तो पैसे मागायला आतां इथें आला म्हणजे ?' कार्यक्रम कसा झाला, इकडे लक्ष देण्याऐवजीं त्याचें सारें लक्ष त्या हमालींत गुंतलेलें !"

### "तो मी नव्हेच"

नांदेडच्या नाट्यसंमेलनांत केलेल्या एका भाषणाचे वेळीं पु. ल. म्हणाले, "गेले दोन महिने माझी इतकी स्तुति करण्यांत येत आहे, मला इतके गुण चिकटविण्यांत येत आहेत कीं कधीं कधीं मनांत येते कीं या लोकांना ओरडून सांगावें– 'तो मी नव्हेच !' रंगभूमीसाठीं ज्यांनीं अपार परिश्रम केले पण जे अवेळीं गेले, त्या पूर्वसुरीच्या श्रेष्ठांच्या वतीनें मी होत असलेल्या स्तुतीचा स्वीकार करतो, एवढेंच."

–– वा. य. गाडगीळ





( पान १० वरून )

प्राध्यापकी केली. आज ते वहात्तर वर्षांचे आहेत. आजही ते उत्तम टेनिस खेळतात. वय त्यांच्या क्रीडेच्या आड येत नाहीं. आज भारत सरकारनें ह्या क्रीडापटुत्वाचा व क्रीडा भक्तीचाच जणुं गौरव केला आहे असें मला वाटतें.

जे. जे. स्कूल ऑफ आर्टसूचे डीन श्री. वि. ना. आडारकर ह्यांनाही 'पद्मश्री'चा मान मिळाला आहे.आज 'जे. जे. स्कूल ऑफ अ़प्लाइड आर्ट' ह्या संस्थेला जी अखिल भारतीय स्वरूपाची कीर्ति मिळाली आहे, ती मुख्यत: आडारकरांच्या प्रयत्नामुळें ! ती त्यांची जीवित श्रद्धा आहे. कमर्शियल आर्ट, प्रिंटिंग टेक्नॉलॉजी आणि इंडस्ट्रियल डिझायनींग ह्या क्षेत्रांत शिक्षण उपलब्ध करून देण्याचे दृष्टीनें संस्थेनें जी प्रगति केली आहे त्याचें श्रेय आडारकरांचें आहे. कलावंतांचे वसतिस्थान म्हणून 'कलानगर'ची निर्मिती व्हावी ही कल्पनाही आडारकरांचीच! १९६२ मध्यें त्यांना ह्या क्षेत्रांतील अविश्रांत परिश्रमांबद्दल आय्. एस्. ए हें त्या क्षेत्रांतलें सर्वोच्च ॲवार्ड देण्यांत आलें. यंदा भारत सरकारच्या आर्टबोर्डच्या अध्यक्षपदीं त्यांची तिसऱ्यांदा अविरोध निवड झाली. स्वातंत्र्यानंतर सरकारी पोस्टेज स्टॅम्प्सची डिझाइन्स तयार करण्यासाठी मार्गदर्शक म्हणून गेलीं १६ वर्षे काम करीत आहेत:– पंडित नेहरूंच्या स्मृतीसाठीं तयार केलेल्या स्टॅंपचे डिझाइन आडारकरांनींच केलें होतें. १९४७ सालीं लंडन येथील ब्रिटिश इन्स्टिटयूट ऑफ आर्ट ॲण्ड डिझाइन ह्या संस्थेनें त्यांना "Honoris Causa" अशी तहहयात सभासदत्वाची मानाची पदवी दिली. इंग्लंडच्या बाहेरील अशा आडारकरांनाच फक्त हा मान मिळाला आहे. विविध राज्यांनीही आडारकरांच्या कलाविषयक ज्ञानाचा लाभ वारंवार घेतला आहे. १९६० मध्यें महाराष्ट्राची 'राजमुद्रा' तयार करण्याचा मान त्यांना मिळाला. 'आर्ट शिक्षण' व 'इंस्ट्रियल डिझाईन' ह्या विषयांवरील त्यांचे ग्रंथही बरेच गाजले. आडारकर ह्यांचा गौरव केला गेला नसता तरच नवल !

* *

## " मुलीच पहिल्या "

'मुली भलत्याच स्कॉलर झाल्यात रे !'

'होय ना. बी. ए. ला पहिली मुलगी. इंटरचं प्राइझ मुलीला. एस. एस. सी ला पहिल्या दहांत सहा मुली.'

'पुणें विद्यापीठाला पण पुष्कळ मुलींनींच बक्षिसें मिळवली.'

'हें तर कांहींच नाहीं–अरे मुंबई, पुणें विद्यापीठाप्रमाणें एस. एन. टी. डी. ला पण मुलीच पहिल्या आल्या म्हणे !'

## गॉड् सेव्ह द् किंग

वात्रटपणा हा स्थलातीत असतो. इंग्लंडमधल्या एका मेडिकल कॉलेजमधली गंमत आहे. तिथल्या एका प्राध्यापकाची राजवैद्य म्हणून नेमणूक झाली. ह्या नेमणुकीबद्दलची माहिती व त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करणारी नोटीस कॉलेजच्या नोटीसबोर्डावर झळकली दुसऱ्याच दिवशीं कॉलेजांतल्या एका विद्यार्थ्यानें त्या नोटीसीखाली मोठ्या अक्षरांत लिहिलेलें एक वाक्य दिसूं लागलें.

'God save the King!'

– माधव अत्रे

# 'स्वामी' चें स्वामित्व

**कलेच्या** क्षेत्रांतलें स्वामित्व हें वयावर, पदवीवर, जातीवर, धर्मावर पुस्तकांच्या संख्येवर अवलंबून नसतें. तर तें कलाकृतीच्या स्वयंभू गुणवत्तेवर अवलंबून असतें. एखादी कलाकृति देऊनही कलाकार अमरपद सिद्ध करून जातो आणि पंचवीस पुस्तकें लिहूनही एखादा कलाकार They also ran मध्येंच रेंगाळत राहतो. एखादी कलाकृति त्या माणसाला हें जें यश मिळवून देते तें केवळ अपघात रूपानें नव्हे. निर्मितीची धुंदी, विषयाची साधना, भावनेचा एकात्म असा आविष्कार इत्यादि अनेक गोष्टी त्यांत येतात. (असें मला वाटतें.) 'स्वामी' ह्या रणजित देसाईंच्या कादंबरीला जे असामान्य यश मिळालें व आतां भारतसरकारच्या साहित्य अकादमीनें त्याला पारितोषिक देऊन जो गौरव केला आहे, तो कांहीं अपघात रूपानें नव्हे. यशापयश हा जरी कांहीं अंशीं दैवाचा भाग असला तरी दैवाला कर्तृत्वाचा आधारभूत पाया असावाच लागतो. 'स्वामी' कादंबरी प्रसिद्ध झाली आणि मराठी कादंबरीच्या क्षेत्रांत तिनें "इतिहास" घडविला. "स्वामी" ह्या कादंबरीनें एका कर्तबगार पेशव्याची ओळख मराठी वाचकाला करून दिली असली तरी तो इतिहास हेंच केवळ त्या यशाचें कारण नाहीं. सान्याच ऐतिहासिक वा पौराणिक कादंबऱ्या 'यशस्वी' होत नाहींत. चांगल्या विषयाला कलेचेंही देणें लागतेंच लागतें. बखरीत व अन्य ऐतिहासिक कागदपत्रांतल्या इतिहासांतलीं माणसें चालती बोलती, सजीव करण्याची किमया अखेर कलाकाराला करावयाची असते. इतिहासांतला 'मानव' शोधायचा असतो ! 'स्वामी' कारांनीं हें काम केलें आहे. कांहीं जणांच्या मतें चित्रपट डोळ्यांपुढें ठेवून त्यांनीं ही कादंबरी लिहिली आहे. चरित्र कथा सांगतांना ही गोष्ट अपरिहार्य असतें असें मला वाटतें. प्रसंगांची गुंफण कलापूर्ण आहे कीं नाहीं ह्या प्रश्नाचें उत्तर जर होकारार्थी मिळालें (तसें तें मिळतें) तर मग तिची कलापूर्णता आपोआप सिद्ध होते. 'स्वामी'कारांनीं हें यश मिळविलें आहे तें तपश्चर्येनें ! 'रणजित देसाई' हें नांव 'स्वामी'नें मोठें केलें असलें तरी कथाकार म्हणून त्यांनीं त्यापूर्वीच स्वत:चें वैशिष्ट्य प्रगट केलें होतें. एक रसीले, रंगेल जीवनचित्रण करावें देसाईनीच ! 'मधुमति' हा त्यांचा संग्रह प्रसिद्ध झाला आणि सर्वस्वीं आगळी अशी मराठी कथा रसिकांना मिळाली. कलासक्त मन, घरंदाज ऐश्वर्य, त्या ऐश्वर्याला साजेशी कलंदर वृत्ति. भरपूर भटकून जीवन पाहण्याची, टिपण्याची व भोगण्याचीही मानसिक तयारी व जिद्द. संगीतादि कलांचे अभिजात वेड आणि त्यासाठीं मुलुखगिरी करायची तयारी ह्यांच्या संगमांतून 'रणजित देसाई' हें नांव घडलें आहे. मधुमति, ताजमहाल, रसूल ह्यासारख्या गोष्टी मला अजूनही मोहवितात. 'रंगल्या रात्रीं अशा' हा चित्रपट घ्या किंवा येणारें 'तानसेन' हें नाटक घ्या, रणजित देसायांच्या संगीतप्रेमी, कलासक्त मनाची ग्वाही देऊन जातात कलेंतल्या भव्यतेचें, दिव्यतेचें, धुंदीचें त्यांच्या प्रतिभेला वेड आहे कलेवरच्या श्रद्धेपायीं समर्पित जीवन जगणारांविषयीं त्यांच्या मनांत नितांत आदर आहे. म्हणूनच–आगळें व समर्थचित्रण त्यांची लेखणी करूं शकते. त्यांच्या ह्या व्यक्ति वैशिष्ट्यांतूनच 'स्वामी' चा जन्म झाला 'कोवाड' चा हा 'शेतकरी' अखिल भारतीय कीर्तीचा 'लेखक' झाला आहे देसाई हे गोष्टीवेल्हाळ आहेत. हंसतमुख आहेत. प्रसन्नवृत्तीचे आहेत कलेवर जीवन 'निछावर' करण्याइतकी कलाधुंदी त्यांच्याजवळ आहे उदारता आहे. सूर आणि लयींचें त्यांना वेड आहे. म्हणूनच त्यांना 'शब्दांचा' योग्य तो 'सूर' सांपडला आहे. 'लय' साधली आहे. आता 'मैफल' रंगणारच असा विश्वास आहे.

–आदित्य






एका जगविख्यात प्रेमिकाच्या अनेक गाहिऱ्या....रसील्या....प्रेमकथा !

# THE ACADEMY AWARD WINNER!



**"BEST PICTURE"**

**"BEST DIRECTOR"**-Tony Richardson
**"BEST SCREENPLAY"**-John Osborne
**"BEST MUSIC SCORE"**-John Addison





*The whole world loves* **Tom Jones!**

STARRING ALBERT FINNEY/SUSANNAH YORK/HUGH GRIFFITH/EDITH EVANS/JOAN GREENWOOD/IN "TOM JONES"/ALSO STARRING DIANE CILENTO
WITH GEORGE DEVINE/AND THE GUEST APPEARANCE OF DAVID TOMLINSON/SCREENPLAY BY JOHN OSBORNE/PRODUCED AND DIRECTED BY TONY RICHARDSON/MUSIC COMPOSED AND CONDUCTED BY JOHN ADDISON/**EASTMANCOLOR**/A WOODFALL PRODUCTION
**A UNITED ARTISTS-LOPERT RELEASE**

एअरकंडीशन्ड **'रीगल'** मध्यें पहा.
(फक्त प्रौढांसाठीं)
दररोज चार खेळ : १--३०, ४, ६--३०, ९--३०

**भारतांत भरलेल्या तिसऱ्या आंतरराष्ट्रीय चित्रपट महोत्सवांत गौरविलें गेलेलें महान चित्र**












अनुक्रमणिका

( पान ८ वरून )

मी आणि सीताराम हा आंकडा पुन: पुन: उच्चारतो. हेतु हा कीं प्रेक्षकांच्या तोंडालाहि पाणी सुटावें.

"दोन हजार रुपये मिळतील हें खरें. पण हें कितपत योग्य आहे ?"

"अरे वेड्या, गांधीजींच्या नांवावर कितीकांनीं पैसा केला आहे."

"म्हणून काय आपण करायचा ? अशानें गांधीभक्ति कमी होईल."

"मुळींच नाहीं. उलट ती वाढेल !"

"कशी ?"

"तें तुला शेवटीं कळेल !"

विचार करीत मी दोन मिनिटें गप्प पुतळ्यासारखा उभा रहातो.

"राम्या, असाच–असाच दोन तास उभा रहा !"

मी तसाच उभा रहातो. प्रॅक्टिस व्हावी म्हणून नव्हे. विचार करण्यासाठीं !

"कर विचार ! पण काय तें आत्तांच सांग. तुला जमत नसेल तर दुसरा एखादा गांधी बघतो."

"माझ्यासारखा इतका हुबेहूब गांधी तुला दुसरीकडे कुठें बरें मिळणार ?"

"म्हणून तर प्रथम तुझ्याकडे आलो !"

"ठीक आहे. रहातो मी उभा !"

* * *

स्थळ : अनावरण समारंभाची जागा.
वेळ : भरत आलेली (पण रात्रीची)
प्रसंग : ओळखलेला.

पुतळ्याच्या चबुतऱ्यावर मी उभा आहे. आठ फूट उंचीच्या चबुतऱ्यावर असा ताठ उभा रहाण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग ! त्यामुळें चक्कर न येवो अशी मी प्रार्थना करतो आहे. पण ती मनांतल्या मनांत असल्यामुळें कुणाला कळत नाहीं. शिवाय अद्याप अनावरण व्हायचें असल्यामुळें माझ्या भोंवती चार पडद्यांचें आवरण आहे. त्यामुळें मी कुणाला दिसत नाहीं. मलाहि कोणी दिसत नाहीं. पण या समारंभासाठीं बाहेर बरीच गर्दी जमलेली असावी. कारण लोकांचा गोंगाट ऐकूं येतो आहे.

सीतारामानें मोठ्या खुबीनें माझ्या अंगावर तुक्तुकीत सफेत लेप चढवला आहे. त्यामुळें मी जिवंत आहे कीं संगमरवरी आहे अशी माझी मलाच शंका येते आहे. थंडी कडाक्याची आहे. पण चारी बाजूनी पडदे आणि वरून कापडी छप्पर असल्यामुळें तशी हुडहुडी भरलेली नाहीं. तशी ती भरली तर मात्र मेलोच ! कडक थंडींत गांधीजी उघडे बोडके कसे रहात होते कोण जाणे ! तो महात्मा दैवी पुरुषच असला पाहिजे.

माझ्या कमरेला कोरा करकरीत खादीचा पंचा आहे. गांधीजींसारखें कनवटीवरून माझें खरें घड्याळ लोंबतें आहे. वास्तविक पुतळ्याच्या अंगावरचें घड्याळ बंद हवें. पण सकाळीं चुकून चावी दिल्यामुळें तें चालूच आहे. अर्थात हालणारा सेकंद कांटा एवढ्या दुरून कुणाला दिसणार नाहीं. हातांत मोठी काठी आहे. त्यामुळें एवढ्या उंचावर तोल सावरणें जमतें आहे. गांधीजी हातांत काठी घेत असत हें माझें भाग्य ! नाकावर कांचा नसलेला चष्मा आहे. डावा हात खालीच आहे. गांधीजी-प्रमाणें तो कुणाच्या तरी खांद्यावर ठेवतां आला असता तर बरें झालें असतें. असो.

माझें पोट मात्र गांधीजीप्रमाणें खपाटीला गेलेलें नाहीं. तें लपावें म्हणून फुलांचे भलेमोठे हार माझ्या गळ्यांत आहेत. त्या ओझ्यानें मी गांधीजींसारखाच वांकलो आहे. 'फुलांसारखा हलका' या शब्दप्रयोगा-वरचा माझा विश्वास आतां पार उडाला आहे. फुलांचें सुद्धां ओझें फार असतें. विशेषत: त्या ओझ्यामुळें हारांचे दोर गळफांस लावीत आहेत. समारंभ दोन तासांत आटोपला नाहीं तर माझें मुंडकेंच तुटून पडेल !

समोरचा पडदा बाजूला झालेला नाहीं तोपर्यंन्त मी नाक तोंड खाजवून घेत आहे. खाज ही अशीच. भलत्या वेळीं भलत्याच ठिकाणीं येते काय काय म्हणून आतां खाजवायचें ? फुलांतल्या हुळहुळ्या मुंग्या आतां पंच्यांतहि शिरल्या आहेत !

---

**Statement about ownership and other particulars about newspaper 'Dipavali' Monthly**
**FORM IV (SEE RULE 8)**

| | | |
|---|---|---|
| 1. | Place of publication ... | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. | Periodicity ... | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printers' Name ... | Shri Dinanath Damodar Dalal. |
| | Nationality.... | Indian. |
| | Address ... | 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. | Publishers' Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or share-holders holding more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole proprietor. No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 20-2-1965. D. D. Dalal
Signature of publisher.





लोकांचा गोंगाट कमी होतो. टाळ्यांचा कडकडाट ऐकूं येतो. बहुधा अध्यक्ष आणि वक्ते आले असावेत.

"लोकहो, आता कार्यक्रमाला प्रारंभ होत आहे. तरी मागें उभे असलेल्या जनतेनें कृपा करून बसून घ्यावे. भाईओ, बैठ जाईये !"

हा आवाज देशभक्त सावाजीचा. दे. भ. सावाजी हा गांधी स्मारक समितीचा चिटणीस आहे. हा जन्मभर भाषणें करतो आहे. पण त्याला 'त' उच्चारतां येत नाहीं. 'त' ऐवजी तो 'ट' म्हणतो.

"मी आटा आपणास आघीं समिटीचा अहवाल सादर करटो..." अशी सुरुवात करून दे. भ. सावाजी लोकांस सतावण्याचें काम सुरू करतो. वास्तविक दोन पानी अहवाल वाचून या देशभक्तानें खालीं कां बसूं नये ? गांधीजीनीं केलेले 'सट्टयाचे प्रयोग' यानें कशाला समजावून सांगायचे ? जनतेचा गैरसमज झाला म्हणजे ?

आतां हा माणूस लवकर खालीं बसेल तर बरें ! कारण अंगावरल्या मुंग्या जाऊं नये तिथें जात आहेत.

टाळ्यांचा आवाज ऐकूं येतो. देशभक्त बसला असावा. अध्यक्ष-महाराजांना बोलण्याची विनंती केली जाते.

अरे बापरे ! समोरचा पडदा बाजूला होतो. मूर्खच माणूस आहे. अनावरण करतो असें जाहीर करण्याआधींच तो बटण दाबून मोकळा होतो. तरी बरें, मी जांघा खाजवीत नव्हतो. भलताच प्रसंग ओढवला असता.

लोक मला मागें वळून पाहातात आणि टाळ्या मारतात. त्यांना पुतळाच उभा आहे असें वाटलें असावें.

"या पुतळ्याचें अनावरण करण्यास मला आनंद होतो आहे–" हें हा अध्यक्ष आतां जाहीर करतो आहे. मूर्ख लेकाचा !

टप् टप् टप— पावसाचे थेंब पडतात. लोक चुळबुळून उठूं लागतात. तेव्हां "हा पाऊस नसून हे गांधीजींचेच आनंदाश्रु आहेत–" असें अध्यक्षमहाराज बजावून सांगतात. तें कशाच्या आधारावर कोण जाणे ! ते दुःखाश्रु कशावरून नसतील ? तथापि पाऊस येऊन लोक पळतील तर बरें ! एक गोष्ट बरी आहे. या अध्यक्षाला नीट बोलतां येत नाहीं. तो ट–ट–प–प करतो आहे, आणि पाऊस टप टप टप करतो आहे. त्यामुळें कधीं त्याचें भाषण संपतें आणि आपण पळ काढतो अशा तयारींत लोक आहेत. प्रभो, तुझी लीला अगाध आहे.

☆ ☆ ☆

स्थळ : तेंच.

वेळ : भरलेली.

प्रसंग : अत्यंत बांका.

सभा आटोपली आहे. बहुतेक लोक पुतळ्याकडे न बघतांच पसार झाले आहेत. परिणाम थोडासा पावसाचा आणि बराचसा वक्त्यांचा ! पण कांहीं आगाऊ लोक मात्र आतां पुतळ्याभोंवतीं म्हणजे माझ्या भोंवती घोंटाळत आहेत. ते जवळ येऊन मला निरखण्याचा प्रयत्न करीत आहेत.

"हुबेहूब गांधीसारखा दिसतो नाहीं ?" कुणी तरी म्हणतो.

"थँक्यू !" माझ्या जिभेच्या टोंकावर शब्द येतो. पण मी तो गिळतो.

लेकाचे आतां घरीं जातील तर बरें ! फार जवळ आले तर कंब-क्तीच !

शाब्बास ! सीताराम तसा हुशार आहे. त्यानें गडबडीनें पडदा मिटून घेतला.

ऑक्शी ऽऽऽ !

अरे बापरे ! एकदम शिंक येते. हारांतल्या कलाबुतूची तार नाकांत गेली त्याचा हा परिणाम ! कधीं एकदां हें हारांचें ओझें उतरून ठेवतो असें झालें आहे ! हारांमागून हार गळयांत घालून घेणारे लोक खरोखरच धन्य होत !

सीतारामानें पडदा मिटून घेतला म्हणून सुटलो. मी शिंकतांना लोकांनीं पाहिलें असतें तर त्यांनीं मुळासकट पुतळा उखडून टाकला असता. पण आतां कार्यक्रम संपला आहे, हा सीताराम आंत येऊन हा पुतळा उखडेल तर बरें ! कारण शिंकतां शिंकतां नाकावरला चष्मा खालीं पडला आहे.

पडदा हळूच बाजूला सारून कुणी तरी आंत डोकावतो. मी डोळे किलकिले करून पाहातो आहे. पण काय उपयोग ? माझ्या डोळ्या-देखत तो गांधीभक्त चष्म्याची फ्रेम उचलून खिशांत टाकतो. अरे गाढवा, हेंच का तुला राष्ट्रपित्यानें शिकविलें ?–हें माझें मनांतल्या मनांत स्वगत ! पण मी कांहीं बोलूं शकत नाहीं. कारण बोलून चालून मी तर दगडी पुतळा ! बोलणार कसा ?

"अभी भागो. चलो घरीं पळा ! पाऊस येतोय्-" हा सीताराम लोकांना पळवतो आहे. निदान मी इथें उभा आहे हें त्याच्या लक्षांत आहे ! ठीक आहे !

पडदा बाजूला करून कुणी तरी हमाल आंत येतो. चोरासारखा जवळ येतो. बेट्या, लक्षांत ठेव ! मी दगड नव्हे. नज़र शाबूत आहे ! तो हमाल शेजारच्या शिडीवर चढतो आणि हळूंच माझ्या कमरेचा पंचा खेचतो.

"हट्–" मी न राहवून हळूंच ओरडतो.

त्यासरशीं पुतळयांत जीव आला असें वाटून तो घाबरतो आणि शिडीवरून कोलमडून खालीं पडतो. जिवाच्या आकान्तानें तो पडद्या-खालून मागच्या मागें धांवत सुटतो. गांधीजींच्या या देशांत गरीब लोकांना पुरेसें वस्त्र मिळत नाहीं हें खरें ! पण म्हणून काय त्यानीं गांधीजींच्या वस्त्राला हात घालावा ?

वास्तविक मी असें ओरडतां नये होतें. कारण मी बोलून चालून पुतळा ! पण गप्प राहतो तर कमरेचा पंचा जाता. मग काय करायचें ? अरे, निदान राष्ट्रपित्याची तरी अब्रू सांभाळा !

माझी छाती कमालीची धडधडते आहे. पुतळा जिवंत झाला म्हणून चमत्कार दाखवण्यासाठीं त्या हमालानें आणखी माणसें जमवून आणली तर पंचाईत !

तरी सुद्धां मनांतल्या मनांत हर्ष होतो आहे. एकाच गोष्टीसाठीं–त्या हमालानें पंचा ओढला तरी कनवट सुटली नाहीं. नशीब माझें आणि त्या महात्म्याचें ! आणि सीतारामाचें सुद्धां ! आतां तो लवकर आंत येईल तर बरें !

हळूंच पडदा बाजूला करून आणखी एक इसम आंत येतो. मी डोळे किलकिले करीत पाहातो. हा तर देशभक्त साबाजी ! बेट्या, जा आतां घरीं !

दे. भ. साबाजी अट्टल दिसतो. माझ्याकडे न बघतां तो पडद्याकडे बघतो आहे. माझ्याकडे काय बघायचें ? मी संगमरवरी दगड ! आपल्याला कोणी पाहातो आहे कीं काय याकडे त्याचें लक्ष आहे. कांहीं तरी डाव आहे याचा. मी सावध होतो. दोन्ही हाताचे कोपरे कनवटीवर आवळून धरतो. आतां यानें पंचा ओढला कीं कनवट सुटलीच !

तो शिडीच्या दोन पायऱ्या चढतो. माझ्या कमरेवरून लोंबणारे घड्याळ हातीं धरतो. घड्याळाला कान लावून तें खरें आहे कीं नाहीं याची खात्री करून घेतो.

"सत्यमेव जयते. देशभक्ता सचोटीनें कार्य कर–" भरल्या आवाजांत महात्मा दिव्य वाणी बोलून जातात. पण महात्माजींना मराठी बोलता येत होतें कीं नाहीं अशी मला शंका येते.

"गांधीजी की जय" असें पुटपुटत देशभक्त खालीं उडी टाकतो. तो घाबरून पडतोच. पडल्या पडल्या पडद्याखालून तो सरपटत बाहेर पडतो आणि धूम ठोकतो.

छे–छे ! अशी दिव्य वाणी बोलून किती जणांना परतवून लावायचें ? आतां दुसरे कोणी येण्याऐवजीं सीताराम येईल तर बरें !

दिवे मालवतात. काळोख पडतो. सर्वत्र सामसुम होते.

सीताराम आंत येतो. पुष्पहारासकट मला खालीं उतरून घेतो आणि सरळ एका पोत्यांत टाकतो.

"अरे राष्ट्रपित्याचा कांहीं मान. . . ."

सीताराम माझ्या तोंडावर हात ठेवतो आणि सरळ पोतें पाठीला मारून शेजारच्या बैलगाडींत टाकतो. पोत्यावर शिडी ठेवतो. बैलगाडी चालू होते.

☆ ☆ ☆ ☆

स्थळ : माझी खोली.
वेळ : टळून गेलेली.
प्रसंग : निभावलेला.

मी अंगावरचा रंगाचा लेप खरवडतो आहे. आणि सीताराम नोटा मोजतो आहे.

"राम्या, धन्य आहेस ! खरा राष्ट्रपिता शोभतोस ! एवढे कष्ट पुतळयासारखे मुकाटपणें सहन केलेस. धन्य तुझी ! हे घे तुझे दोन हजार रुपये ! यापुढें याबाबतींत संपूर्ण मौन पाळ. नाहीं तर निष्कारण प्राणांतिक उपोषणाची पाळी येईल !"

"सीताराम, तूं पतित पावन सीताराम आहेस हें खरें ! पण आतां यापुढें कुठें गांधीजींचें स्मारक उभारण्याचें कंत्राट घेऊं नकोस !"

"ठीक आहे !"

सीताराम निघून जातो.

मी खोली बंद करतो. काळोख होतो.

☆ ☆ ☆ ☆

स्थळ : अनावरण समारंभाचें.
वेळ : चमत्कारिक.
प्रसंग : अटीतटीचा.

पुतळयाचा चबुतरा मोकळा आहे. त्यावर फुलें आहेत. पुतळा कुठें नाहीसा झाला अशा विचारानें लोक चकित झाले आहेत.

"काय झालें असेल त्या पुतळयाचें ?"

"पुतळा गेला कुठें ?"

लोक एकमेकांशीं कुजबूज करीत आहेत.

"हा दैवी कोप आहे. पुतळा कुणी उखडला असता तर चबुतऱ्याचा दगड फुटला असता. ज्या अर्थी चबुतरा होता तसा आहे, त्या अर्थी दैवी सामर्थ्यानेंच पुतळा अदृश्य झाला आहे." सीताराम दिशा घालून देतो.

"हें गांवांतलें पाप भोवतें आहे !" एक म्हातारा शिक्कामोर्तब करतो.

"अरेरे ! गांधीजी सदेह निघून गेले !" एक वारकरी बोलतो.

"पुतळा अनंतांत विलीन झाला !" आणखी एक निदान.

"गांधीजींचीं पावलें दिसताहेत–" मी जमिनीवर माझीच पावलें शोधतों.

लोक एकाएकी भाविक बनतात. चबुतऱ्यावर फुलें, नारळ, सुताच्या लडी आणून टाकतात. त्यावरहि सीतारामाची नजर आहेच.

कालचे अध्यक्ष महाराज पुनः हजर होतात. पुनः सभा भरली आहे असें समजून चबुतऱ्याच्या बाजूला उंचावर उभे रहातात. आणि ओरडून म्हणतात, "लोक हो, गांधीजींची शिकवण आम्ही नीट आचरली नाहीं म्हणून गांधीजींचा पुतळा अदृश्य झाला आहे. गांधीजी हे दैवी पुरुष होते. ते हयात असेपर्यन्त आम्हाला तें कळलें नाहीं. यापुढें त्या दैवी पुरुषाची शिकवण आपण आचरणांत आणली तर कदाचित् याच चबुतऱ्यावर पुनः गांधीजींचा पुतळा दिसूं लागेल."

तें ऐकून माझी छाती धडधडत रहाते.

अध्यक्षमहाराजांचें भाषण चालूच आहे, "महात्माजींच्या विचार-सरणीप्रमाणें आपलें आचरण ठेवण्याची आज आपण प्रतिज्ञा करूं या आणि त्या प्रतिज्ञेचा शुभमुहूर्त म्हणून महात्माजींच्या आवडीचें भजन म्हणूं या...."

तावडतोब वरेचसे लोक खाली बसतात आणि टाळ्या वाजवीत 'रघुपति राघव राजाराम–पतित पावन सीताराम' हें भजन गाऊं लागतात.

मी भेदरलेल्या नजरेनें चौफेर पहातो आहे.

फुलें, उदबत्त्या घेऊन लोक भक्तिभावानें चबुतऱ्याला नमस्कार करीत आहेत. कुणी तरी गडबडीनें चबुतऱ्यावर फुलें ठेवतो. त्या फुलांत चष्म्याची फ्रेम आहे. कुणाला तरी फुलांत चष्मा दिसतो. तो सर्वांना सांगत सुटतो. आणखी एक चमत्कार म्हणून सगळे लोक भजन सोडून चबुतऱ्यावर तुटून पडतात.

पुनः अध्यक्षमहाशय उठतात.

"लोक हो, पहा हा दैवी चमत्कार. भजन करतांच महात्माजींचा चष्मा दिसूं लागला. आपण आपलें आचरण सुधारलें तर पुतळाहि दिसूं लागेल."

पुनः लोक भजनांत दंग होतात.

भजन करतां करतां एक हमाल रडतो आहे. गांधीजी अदृश्य झाले म्हणून तो रडतो आहे असें सर्वांना वाटतें. पण त्या रडण्यांत पश्चात्ताप आहे हें फक्त मीच एकटा ओळखतो.

देशभक्त सावाजी येतो. चबुतऱ्यावर फुलें ठेवून नमस्कार करतो.

"काय झालें पाहा–" मी म्हणतो.

"दैवी चमत्कार आहे. दैवी चमत्कार" साबाजी म्हणतो.

**चांदण्यांचें जग**

## या वर्षाचें 'सर्वोत्कृष्ट' विनोदी चित्र "टॉम जोन्स !"

**या** महिन्यांत रीगल चित्रपटगृहांत या वर्षात 'सर्वोत्कृष्ट' म्हणून ठरलेलें असें '**टॉम जोन्स**' हें विनोदी चित्र युनायटेड आर्टिस्ट-तर्फे सादर होत आहे.

'टॉम जोन्स', हा चित्रपट ह्या वर्षीचा 'सर्वोत्कृष्ट' चित्रपट म्हणून जाहीर झाला इतकेंच नव्हे तर 'आदर्श पटकथा', सर्वोत्कृष्ट दिग्दर्शन, सर्वोत्कृष्ट प्रमुख भूमिका आणि 'प्रभावी संगीत योजना' ह्यांचीं पहिल्या अनुक्रमाचीं बहुमानाचीं पारितोषिकें या चित्रानें पटकावलीं आहेत. न्यूयॉर्क फिल्म क्रिटिक् या मान्यवर संस्थेनें योजलेल्या या प्रतिवार्षिक चित्रपट स्पर्धेत ह्या चित्रपटाला पहिल्या अनुक्रमाचीं चार बक्षिसें बहाल करण्यांत आलीं हा एक फार मोठा विक्रम आहे. कारण न्यूयॉर्क फिल्म क्रिटिक् ही एक फार कठोर अशी चित्रपरिक्षक संस्था म्हणून प्रसिद्ध आहे आणि हॉलिवुडच्या ऑस्कर पारितोषिका एवढेंच महत्व ह्याहि बक्षिसांना खास आहे असें चित्रपटसृष्टींतील जाणकारांचें मत आहे ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.

हा चित्रपट रंगीत आहे. परंतु यांत खरा रंग भरला आहे त्यांतील कथानायकानें! वेगवेगळ्या प्रेमप्रकरणांत आपल्या इरसाल बेडरपणानें त्यानें जे बहुरंगी बहुढंगी खेळ केले आहेत ते इतक्या यथार्थतेनें कीं ह्या वर्षीचें 'सर्वोत्कृष्ट' प्रमुख भूमिकेचें पारितोषिक अॅल्बर्ट फिन्नें या अभिनेत्यानें सहज लीलेनें पटकावलेलें आहे. चित्रपटकथानक जुन्या प्रसिद्ध गाजलेल्या कादंबरीवर आधारलेलें. त्यांतील जीवन अठराव्या शतकामधील इंग्लंडचें. चित्रिकरणासाठीं म्हणून दिग्दर्शकानें आपला मुक्काम इंग्लंडमधल्या वेगवेगळ्या खेडोपाडी ठेवला आणि चित्र पुरें केलें. हास्यरसानें तुडुंब भरलेला असा हा 'टॉम जोन्स' चित्रपट त्यानें दिग्दर्शित केला आहे इतकेंच नव्हे तर त्या अपूर्व अशा चित्राचा निर्माताहि तोच आहे ! सर्वोत्कृष्ट दिग्दर्शनाचें या वर्षीचें बक्षीस निर्माता दिग्दर्शक टॉनी रिचर्डसन ह्यानें मिळविलें आहे ही अपूर्व घटना चित्ररसिकांना मोह पाडणारी आहे.

**—चित्रगुप्त**

"पुतळ्यासारखा पुतळा.."

"बोलूं नकोस. तो दैवी पुतळा होता. तो जिवंत पुतळा होता. त्यांत गांधीजींच्या आत्म्यानें प्रवेश केला होता."

"कशावरून ?"

"निश्चितच ! त्यांचें घड्याळ सुद्धां चालूं होतें..."

"घड्याळ चालू..... ?"

आपण घसरतो आहे असें वाटून दे. भ. सावाजी भजनांत मग्न होतो. रघुपति राघव राजाराम–पतित पावन सीताराम..प्रचंड घोष चालू आहे. आतां इथेंच पडदा टाकायला काय हरकत आहे? ● ● ●

अनुक्रमणिका

**रंगमंच**

# हे कोण आचार्य अत्रे ?

## छे ! श्री. सदानंद जोशी यांनी उभे केलेले ' अस्सल अत्रे '

**मराठी** माणसाचं मन मोठं विचित्र आहे. तें उत्कट आहे. मनस्वी आहे. भारावून जाणारं. आपल्यावर होणाऱ्या अन्यायाबद्दल पोटतिडिक वाळगणारं. एखाद्या माणसावर वेडावून जाऊन प्रेम करणारं आणि त्या प्रेमापोटीं त्या त्या माणसाच्या गुणांसगट दोषांनाही पोटांत उदार असा आश्रय देणारं असं आहे. त्यानें बालगंधर्वांवर जें प्रेम केलं तें असं केलं. गंधर्वांचे सारे गुणदोष त्याला ठाऊक असूनही केलं. आचार्य अत्रे ह्यांच्यावरही मराठी माणसाचं असंच प्रेम आहे. अत्र्यांसंबंधी बोलतांना तो वारंवार थबकेल. 'हें पटत नाहीं.' 'हें मला आवडत नाहीं.' 'हें अति झालं.' असे शेरेही तो मारील. पण तें मारतांनाही त्याच्या मनांत मात्र त्यांच्याविषयींची उत्कट प्रीतीच असेल. ह्या प्रीतीमुळेंच आचार्य अत्रे आणि महाराष्ट्र ह्या गोष्टींचं एकसंघ रसायन तयार झालं आहे. त्या रसायनाचे विविध उद्रेक महाराष्ट्राच्या सामाजिक, राजकीय, साहित्य-कलाविषयक क्षेत्रांत अधुनमधून होत असतात. असाच एक नवा उद्रेक अलिकडेच झालेला आहे— कलेच्या क्षेत्रांतला ! त्याचं नांव आहे "**मी अत्रे बोलतोय्**"!

महाराष्ट्राचे एक अग्रगण्य नकलाकार, व्यक्तिदर्शनकार श्री. सदानंद जोशी ह्यांनीं दि. १७ जानेवारी १९६५ रोजीं आचार्य अत्रे ह्यांच्या उपस्थितींत एक अभिनव कलाप्रकार सादर केला. साहित्यिक व्यक्तिदर्शनाचा हा कार्यक्रम महाराष्ट्रांतच केवळ नव्हे तर भारतांत सर्व प्रथम होत आहे. तो महाराष्ट्रांत होत आहे. मुंबई-पुण्यांत होत आहे आणि तोही प्रत्यक्ष त्या व्यक्तीच्या समोर होत आहे हा सारा योग मोठा भाग्याचा आहे. सदानंद जोशी ह्यांनीं आजपर्यंत सानेगुरुजी पासून गोळवळकर गुरुजींपर्यंत विविध व्यक्तिदर्शनें सादर केलीं आहेत. त्यांना कीर्ति मिळाली आहे. व्यावहारिक यशही मिळालं आहे. पण कलाकार महत्वाकांक्षी असेल आणि नवनवीन समर्थ स्वप्नें पहाण्यांची ताकद त्याला असेल तरच त्याची प्रगति होत राहते. सदानंद जोशी ह्यांच्याजवळ ह्या दोन्हीं शक्ति आहेत. जिद्द आहे. कष्ट करण्याची मानसिक (व शारीरिक) तयारी आहे. म्हणून प्रतिकूलतेंतही ते फ्रान्सला गेले, इंग्लंडला गेले व मूकाभिनय शिकून परत आले. तेथें "एमलिन विल्यम्स" त्यांनीं पाहिला आणि एक नवें स्वप्न टेम्स नदीच्या कांठीं त्यांना गवसलें. त्या स्वप्नाचें सगुण साकार रूप म्हणजे "**मी अत्रे बोलतोय् !**"

आचार्य अत्रे ह्यांना अवघा महाराष्ट्र ओळखतो. त्यांच्या सामाजिक, साहित्यिक, राजकीय, कलात्मक जीवनाचे सर्व चढउतार पाहिलेली ही पिढी आहे. त्यामुळें अत्र्यांचें माहीत असलेलेंच जीवन तीन तास पुन्हां त्यांच्याच शब्दांत आपल्या अभिनयाची जोड देऊन श्रोत्यांना ऐकवायचं ही एक तारेवरची कसरतच होती. त्यांत अत्रे समोर बसलेले. त्यांचा स्पष्टवक्तेपणा सुपरिचित. त्यांच्या ताजमहालाला वीट लावली तर ते उफाळून उठतात हें ठाऊक. तरीही ही कसरत सदानंद जोशी ह्यांनीं यशस्वीपणें पार पाडली असें म्हणायला प्रत्यवाय नाहीं.

आचार्य अत्र्यांच्या जीवनांतले कांहीं प्रसंग घेऊनच हा कार्यक्रम सादर करणें शक्य आहे. त्या प्रसंगांची निवड. त्यांचें संकलन. तें करतांना मधल्या जोडणाऱ्या दुव्यांसाठीं सुद्धां अत्र्यांच्या भाषेची जडणघडण कायम राखणें. अत्र्यांच्या व्यक्तित्वाचे विविध पैलू त्यांत यावेत ही काळजी घ्यायची. हंसू आलं तरी हास्यास्पदता येऊं द्यायची नाहीं ही काळजी घ्यायची ह्यासारख्या अनेक गोष्टी त्यांत पहायच्या होत्या. प्रत्यक्ष व्यक्तिदर्शनापेक्षांही हें काम अवघड होतें. (आहे ह्याची जाणीव श्री. जोशांनीं अनेकदां व्यक्त केली). परंतु तरीही श्री. जोशी ह्यांनीं हा 'एकरूपी' कार्यक्रम प्रयत्नपूर्वक, चांगला सादर केला असेंच मी म्हणेन. प्रसंगांच्या निवडीबाबत, विशेषत: जीवनाचा जेव्हां खूप मोठा असतो तेव्हां, मतभेदाला वाव असतो. तसा तो इथेंही आहे. आचार्य अत्रे ह्यांच्या स्वभावाचें त्यांच्या एका निकटवर्तियानें फार चांगलें पृथ:करण नुकतेंच माझ्याजवळ केलें. अत्युत्कट स्वभाव त्यांचा आहे. एखाद्या विषयानें भारावून जाणें, जीव तोडून त्यावर प्रेम करणें आणि मग दुसरें तसेंच कांहीं दिसले कीं त्यानें तितकेंच भारावून जाणें हें घडतें. ते विविध "क्षण" जगतात. त्या त्या क्षणींच फक्त ते 'ते' असतात. आणि मग पुन्हां एक प्रकारची पोकळी उत्पन्न होते. आचार्यांचे हें 'व्यक्तित्व' केवळ शब्दांत प्रगट करणें कठीण आहे. म्हणूनच मग श्री. जोशी ह्यांनीं कांहीं ठळक व महत्वाच्या प्रसंगांची, लोकांना सह्य होतील, लोकांना बांधून ठेवूं शकतील अशा प्रद्धतीनें निवड केली आहे.



हें आत्मकथन सासवडला सुरू होतें. गांवाचें वर्णन करतांना "असं गाव अवघ्या जगांत नाहीं." ह्या खास 'आत्रेय' पद्धतीनें उच्चारलेल्या वाक्यानें रंगत भरायला सुरुवात होते. मग भावे स्कूलमधल्या एकेका शिक्षकांचे नमुने 'पेश' होतात. प्रेतयात्रेच्या सामानानें घडून आलेला 'विनोद' सादर होतो. शाळेंतल्या वक्तृत्वाचा पाहेला मजेशीर अनुभव त्यांतल्या बारकाव्यांसह सांगितला जातो आणि "कांहींही झालं तरी झालं, म्हणून म्हणायचं नाहीं असा मी निश्चय करून टाकला" इथें "अत्रे" दाद घेतात. शिक्षणाधिकाऱ्यानें केलेल्या अपमानाचा सूड घेण्याच्या ईर्ष्येनें अत्रे इंग्लंडला जातात. "टी. डी" मिळवून परत येतात. अनेक रम्य स्वप्नें. रंगवीत काशीला सुखी करण्याची ईर्ष्या बाळगून ! पण घरांत पाऊल टाकतांच 'काशी'ची क्षयानें केलेली दुर्दशा दिसते. उत्कट स्वभावाचे अत्रे विकल होतात. मध्यंतर होतें.

दुसऱ्या भागांत "मी विडंबनकार कसा झालो" हा भाग सांगत सुरुवात होते. वास्तविक मी भावकवि होणार होतो. पण कांहीं कवींच्या 'फॅडस्'चा मला संताप आला व मी विडंबक कवि झालो ही भूमिका ते सांगतात. नंतरच्या भागांत अत्र्यांच्या व्याख्यानांचा, खाजगी बैठकींतील विनोदांचा उपयोग अधिक केला गेला आहे. त्यामुळें प्रेक्षागार ह्या भागांत खदखदत राहतें. परंतु पहिल्या भागांत जी एक सलग अशी परिणामकारकता जाणवते तशी ती उत्तरार्धांत जाणवत नाहीं. त्यांतही विनोदाचे तुकडे जोडण्याचा व त्यांतून भरपूर करमणुक साधण्याचा प्रयत्न दिसतो (विडंबन काव्याचा भाग सोडून) श्यामच्या आईला

(पान ७६ वर पहा)


LIFEBUOY
for health








मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास








## साहित्य

### नवसाहित्याचे "शंकराचार्य"— टी. एस्. एलिएट

**१९६५** या नूतन वर्षाचं जगाकडून नुक्तं कुठं हार्दिक स्वागत होत होतं, तोंच कानीं वार्ता आली कीं टी. एस्. एलियट निवर्तले. एक युगकर्ता व युगहर्ता कवि अंतर्धान पावला. युगकर्ता: कारण एलिएटने स्वतःचे असें विलक्षण वेगळें युग निर्माण केले. युगहर्ता: कारण इतर कोणत्याहि युगांत कोणत्याहि महाकवींचा विश्वकाव्यावर एवढा महान व सक्रीय प्रभाव पडला नव्हता. चर्चिलप्रमाणेंच निराळ्या संदर्भात एलिएटने केवळ आपल्या व्यक्तिमत्वानें या शतकातील जागतिक काव्यसृष्टी उजळून टाकली होती व युगायुगाचे प्रस्थापित संकेत उघळून लावले होते. आणि तरीहि अंतर्संवेदनेनें युगायुगाशीं नात्याचा धागा तो जोडून होता. या अर्धशतकांतील कोणत्याहि भाषेंतील काव्य तुम्ही वाचा, कुठे ना कुठें तुम्हाला एलिएटचा स्पर्श झालेलें असेंच तें काव्य आढळून येईल. पण काव्यावरच नव्हे तर एलिएटचा प्रभाव जागतिक राजकारणावर, विज्ञानावर व एकूण विश्व विचारसरणीवर व आचरणावर-देखील पडलेला तुम्हांला आढळून येईल.

स्वतःबद्दल बोलणं त्याला आवडत नसे. एवढंच तो म्हणायचा, 'मी कांहीं लोकांना आवणारा कवि नव्हे.' गंमत अशी आहे की एलिएटच्या समीक्षेबद्दल, त्याच्या प्रबंधाबद्दल व काव्याबद्दल पुष्कळ पुस्तकें लिहिली गेली आहेत. पण त्याचा चरित्र ग्रंथ क्वचितच लिहिण्यांत आला आहे व जें कांहीं त्यांत त्याचं चरित्र म्हणून लिहिलं गेलं असेल, त्याला त्याचं चरित्र म्हणता किंवा मानता येईल कीं काय शंकाच आहे. त्याच्याच शब्दात त्याचं चरित्र असं आहे— "Classical in literature, royalist in politics and anglo-Catholic in religion". त्याचा जन्म अमेरिकेंत झाला. २६ सप्टेंबर १८८८. त्याची आई नाट्य गीतें लिहायची; नंतर त्या काव्याचं संपादन पुत्रानें केलं होतं. हार्वर्ड विद्यापीठांत (१९०६) शिकत असतांना त्याने लिहिलेली कविता अगदीच सामान्य होती. पौर्वात्य तत्त्वज्ञानाने तो भारला गेला होता; परंतु पाश्चात्य परंपरेबद्दलची आपली तारतम्यबुद्धि धोक्यांत येईल, म्हणून त्या तत्त्वज्ञानाचा त्याने मध्येच छंद सोडला; त्या विषयावर डॉक्टरेटसाठीं लिहायला घेतलेला प्रबंध त्यानें अपुरा सोडला. जर्मनींत असतांना बॉदिलेर व लॅफोर्ग या कवींच्या प्रतीकात्मक काव्याचा त्याच्यावर प्रभाव पडला. 'इंग्रजी भाषेंत नसलेली कविता' लिहावी असे त्यांनीच त्याला वाटायला लावले. त्याचं दीर्घ काव्य The Waste Land त्याच्या कीर्तीचा आधारस्तंभ मानलं जातं. त्याच्या नाटकांपैकीं The Elder Statesman आणि The Family Reunion ही नाटके रंगभूमी वर 'त्रिमूर्ति'चं तत्त्वज्ञान आणू पहातात. त्याच्या काव्यावरही त्रिमूर्तीचा प्रतीकात्मक प्रभाव फार उत्कटतेने पडला आहे. हेमिंग्वेने एकदा म्हटलं होतं, "मिस्टर एलिएटला आपली स्वतःची कविता कां बरें लिहितां येत नाहीं ?" असा हा १९४८ मध्यें नोबेल पारितोषिक, व १९६४ मध्ये अमेरिकेचे 'स्वातंत्र्य पदक' मिळविणारा युगायुगाचा द्रष्टा कवि !

☆☆

### मरणालाही मारून उरणारा महापुरुष विन्स्टन चर्चिल

**अखेर** मृत्यूपुढें सर विन्स्टन चर्चिलला देखील हार खावी लागली; पण ही हार त्याने सहजासहजी खाल्ली नाही. In Defeat: Defiance अशी युद्धत्रस्त विश्वाला घोषणा देणारा चर्चिल स्व. जीवनांत देखील मृत्यूला अखेरपर्यंत आव्हान देत होता व मृत्यूची आक्रमक वाटचाल पावला पावलावर थोपवून धरीत होता. शेवटीं विजयांत देखील मृत्यु पराभूत झाला व पराभवांत देखील चर्चिल मृत्युंजय ठरला: अमर झाला. चर्चिलच्या मृत्यूबरोबर विसाव्या शतकांतील अतिमानवांची विराट परंपरा संपुष्टांत आली आहे. तलवार, लेखणी व कुंचला यावर सारखेच प्रतिभामत्त प्रभुत्व असलेला चर्चिल एवढा महामानव तर विसाव्या शतकांत कुणी नव्हताच पण इतर शतकांतदेखील कधी काळी होता की काय नकळे ! भारताच्या गेल्या अर्धशतकाच्या स्वातंत्र्य लढ्याशी चर्चिलचे नांव नित्य निगडित झाले आहे. कट्टर साम्राज्यवादाचें कंकण हातीं बांधणारा चर्चिल तें कंकण तुटल्या फुटल्यावर कटुता विसरून जाऊन भारताच्या लाडक्या नेत्याशीं— पं. जवाहरलालजींशीं मृदुतेचे बोल बोलला, व गौरवाने म्हणाला, "हा पहा एक केवढा थोर पुरुष. मी ह्याचं स्वागत करतो- ह्याने रागावर व द्वेषावर विजय मिळविला आहे." विश्वावर कोसळलेले दुसऱ्या महायुद्धाचें अमंगळ अरिष्ट एकट्या चर्चिलनें जेवढें शस्त्रसामर्थ्याने टाळले तेवढे आपल्या शब्द सामर्थ्याने टाळले. नेताजी सुभाषबाबूंच्या 'मला रक्त द्या. मी तुम्हाला स्वातंत्र्य देईन' या दीप्तिमान शब्दांचे नाते विश्वनेतृत्व घेतलेल्या चर्चिलच्या 'रक्त, श्रम, अश्रू, घाम' या प्रभावी शब्दांशी जोडता येईल, एवढा चर्चिलच्या वाणीचा अंमल विश्वांतील वायुलहरींवर, कणाकणावर व लोकमनावर दृढ बसला होता. त्यावेळीं जिथे जिथे चर्चिलचें पाऊल पडले ती भूमि अक्षरश: हादरून गेली व निर्घृण शत्रूंची दाणादाण झाली. चर्चिल नसता तर आज जगाचे काय झाले असते या कल्पनेनेंच अंगावर शहारे येतात. या युगपुरुषोत्तमानें एका युगाचा इतिहास कृष्णकाळापासून तगविला. तमाकडून त्याला प्रकाशाकडे नेले. पण इतिहासांत अमर झालेला हा पुरुष वाङमयेतिहासांतही अमर झाला आहे. कदाचित् त्याचे अक्षर साहित्यच त्याच्या नांवाची अक्षरे जोवर इंग्रज भाषा आहे तोवर कधींच कालपटावरून पुसूं देणार नाहीं. सारेच कांहीं विराट, अलौकिक, अचाट व अफाट असणाऱ्या चर्चिलचे स्मृतिग्रंथहि त्यांच्या भाषाप्रभुत्वामुळें व भाषाशैलीमुळे व त्याहूनही अधिक त्यांतील लेखकाच्या व्यक्तित्वामुळे जागतिक वाङमयांत आपली आगळी जागा व्यापून राहिले आहेत. जीवनाच्या शेवटच्या क्षणापर्यंत जीवनाबरोबरच क्षणाक्षणानें विकसित होणारा व जीवनाचा निरोगीपणानें व स्वच्छंदाने आस्वाद घेणारा व जीवन रंगमय व गंधमय करणारा व शत्रूमित्रांना देखील हवाहवासा वाटणारा चर्चिल, खरोखरच 'यासम हा' होऊन गेला असेच म्हटलें पाहिजे.

☆☆

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### नांदेडचे नाट्यसंमेलन

४७ वें मराठी नाट्यसंमेलन नांदेड मुक्कामीं दिनांक ३१ जानेवारीला भरलें व दि. २ फेब्रुवारी ह्या दिनीं तें संपलें. संमेलनाध्यक्ष-पदीं महाराष्ट्राचे 'बहुरूपी' लेखक श्री. पु. ल. देशपांडे हे होते. संरक्षणमंत्री ना. यशवंतरावजी चव्हाण ह्यांनीं याचें उद्घाटन केलें. सर्वसाधारणपणें अशा संमेलनाचे कार्यक्रम जसे आंखले जावेत तसेंच ते आंखले गेले होते. चर्चा, व्याख्यानें, नाटकें, ठराव, अध्यक्षीय भाषण, समारोप वगैरे वगैरे ! नांदेडलाही असेंच घडलें. चांगलें घडलें. म्हणजे चर्चा रंगल्या. नाटकें रंगली. आचार्य अत्र्यांचें व्याख्यानही (मी व माझीं नाटकें) रंगलें. व्यवस्था चोख होती. त्यामुळें पाहुणेही तिथें रंगले. एकूण संमेलन (इतर संमेलनांप्रमाणेंच) यशस्वीपणें पार पडलें. उगीच पद्धत म्हणून हें म्हणत नाहीं. अनेक चांगल्या गोष्टी संमेलनांत घडल्या म्हणून मी हें म्हणतो. संमेलन 'यशस्वी' झालें असें जेव्हां मी म्हणतो तेव्हां माझ्या मनांत कांहीं कल्पना असतात. अध्यक्षीय भाषण ह्या गोष्टीला मी सर्वाधिक महत्व देतो. कारण सर्वांत महत्वाचा तो भाग असतो. असावा असें मला वाटतें. नांदेड संमेलनांत अध्यक्ष पु. ल. देशपांडे ह्यांनीं जें भाषण केलें त्या भाषणाचे अनुषंगानें मी पुढें कांहीं लिहिणार आहे. अध्यक्ष देशपांडे ह्यांच्या सर्वच भाषणाचा परामर्ष घेणें येथें कठिण ! पण त्यांनीं मांडलेल्या महत्वाच्या मुद्यांचा विचार मात्र मला अपरिहार्य वाटतो. संमेलनाच्या अध्यक्षानें आपल्या भाषणांत काय बोलावें, कोणत्या कोणत्या विषयांचा परामर्ष घ्यावा ह्याबद्दलही आतां कांहीं संकेत निश्चित झाले आहेत. (तोही एक अपरिहार्य भागच) अध्यक्ष पु. ल. देशपांडे ह्यांच्या भाषणावर मध्यंतरी 'केसरी'त एक लेख प्रसिद्ध झाला होता. तो लेख मागल्या पिढीचे एक नाटककार न. ग. कमतनूरकर यांनीं लिहिला होता. त्या लेखाला उत्तर देण्याची ही जागा नव्हे व तसा माझा हेतुही नाहीं. पण लेख वाचून (मूळ भाषण न वाचल्यामुळें) होणारे गैरसमज टाळण्याचे हेतूनें भाषणांतलें महत्वपूर्ण विवेचन तेवढेंच येथें देतो—

"कुठलीही प्रगति समाजाला एकदम ओरखाडे काढून करतां येते असं मला वाटत नाहीं. कलाक्षेत्रांत सुद्धां "एरियाज् ऑफ अॅग्रीमेंट" शोधाव्या लागतात. नवीन नवीन महत्वाच्या प्रयोगांतून कलेचं नवीन दर्शन घडवून समाजाला सांस्कृतिक शहाणपण आणायचं असेल तर मी तरी हें सावकाशपणाचं, सावधानतेचं तत्व पाळीन" असे ते म्हणतात. नवतेच्या संदर्भांत द्रष्ट्या लेखकालाही समाजाच्या अस्तित्वाची दखल घ्यावी लागते. आपले प्रयोग फसले कीं स्वतःला भवभूति समजणारांनाही देशपांड्यांनीं मौलिक इषारा दिला आहे. त्या संदर्भांत शारदा, नोराचें उदाहरण देऊन देशपांडे ह्यांनीं जी चर्चा केली आहे ती 'अमराठी' 'अभारतीय' जीवनचित्रण मराठी प्रेक्षकांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न करणारांना उद्‌बोधक वाटावी.

रंगभूमीला खाडिलकरांनी, खरेशास्त्र्यांनी जें देणें दिलें त्या देण्यांतून मराठी रंगभूमीची थोर परंपरा सुरू झाली असें सांगून प्रतिभा आणि प्रज्ञा ह्यांचा सुरेख संगम रंगभूमीवर घडल्यानें त्याला तीर्थाचें महत्व आलें हें त्यांनी विशद केलें. परंपरेंतलं सोनं कुठलं आणि हीण कुठलं हें ओळखण्याचं भान राहिलं पाहिजे. प्रगति आणि फॅशन ह्यांचा तोंडवळा सारखा वाटला तरी त्यांत फरक आहे. जुन्यांतलें काय जुनें झालें आणि नव्यांतलें काय नवें आहे हें पारखून घेणें आवश्यक आहे असें सांगून 'संगीत नाटक' ह्या सुंदर नाट्यप्रकारांतलें 'सुंदर' काय हें नीट ध्यानीं न घेतल्याने कशी हानी झाली ह्याचें मार्मिक विवेचन पु. ल. देशपांडे यांनीं केलें आहे. 'संगीत नाटक' हें वास्तविक मराठी रंगभूमीचें समर्थ लेणें, सुंदर लेणें. पण 'औचित्य' विचार सुटल्यानें तें हास्यास्पद झालें हें विवेचन संगीत नाटकाच्या अभिमान्यालाही मान्य करावें लागेल. "संगीत नाटकांत गाणें कृत्रिम नाहीं." पण नटाचे गुण नसतांना गाण्याचा गुण दाखवायला नाटकांत जाणें हें कृत्रिम आहे हें मत कटु असलें तरी विचारणीय आहे.

चांगल्या नाटकाची व एकूण नाटकाच्या कला प्रकाराची देशपांड्यांनीं केलेली चर्चा मुळांतूनच वाचण्यासारखी आहे. दुर्बोधता, सूचकता, ठळकपणा, अतिशयोक्ति, अलंकरण ह्या सर्वांच्या शक्ति मर्यादांची योग्य ती जाणीव त्या विवेचनांत दिसते.

नव नाट्याच्या संदर्भांत 'साक्षात्काराचा' सिद्धांत महत्वपूर्ण नाहीं असें कोण म्हणेल ? "आमच्या कुठल्याही प्रयत्नांना युरोपीय रंगमंचाची फुटपट्टी लावून आमची उंची किती कमी आहे हें दाखविण्यांत समाधान मानून कांहीं साधणार नाहीं." हा इषारा मी फार महत्वाचा मानतो. ह्या संदर्भांतल्या "खाशास्वाऱ्यां"ची अडचणही महत्वपूर्ण वाटते. ज्यांच्या आनंदासाठीं, मनोरंजनासाठीं नाटकें होतात त्या प्रेक्षकांना तुच्छ लेखणारी व त्यांनीं कांहीं ह्यांना न आवडलेल्या नाटकांना गर्दी केली कीं रुष्ट होणाऱ्या ह्या खाशा स्वाऱ्यांच्या बद्दलची खंत खरी नाहीं असें कोण म्हणेल ? नवनाट्याची देशपांडेकृत मीमांसाही अशीच तळमळीतून व्यक्त झाली आहे. ह्या बाबतींतले झ्याँ पॉल सार्त्र यांचे जे वाक्य देशपांड्यांनीं नोंदविलें आहे तें देण्याचा मोह होतो— "The function of a writer is to call spade a spade. If words are sick it is upto us to cure them. I distrust the incommunicable; it is the Source of all Violence." आजच्या समाजाचं प्रतिबिंब आजच्या साहित्यांत दिसत नाहीं. नाटकांतही दिसत नाहीं ही खंत तो व्यक्त करतात. समर्पण भावनेशिवाय कुठल्याही कलेची प्रगति होत नाहीं हें खरें नाहीं काय ?

शेवटीं ललितकला अकादमी संबंधांतल्या माजी मुख्यमंत्र्यांच्या आश्वासनाची आठवण देऊन तिचें महत्व देशपांडे यांनीं प्रतिपादिलें आहे. तिचीं प्रयोजनें सांगतांना खूपसा तपशील त्यांनीं दिला आहे. आजच्या नाट्यरसिकांना गंधर्वांच्या उतार वयांतल्या रेकॉर्डस् ऐकाव्या लागतात. लोंढे हे थोर गायक नट होऊन गेले ह्याची जाणीव एखादी रेकॉर्ड ऐकूनच होते. कलेचा थोर वारसा चालविणारी ही अकादमी हें 'सोनें' जपून ठेवूं शकेल. आज माझ्या दृष्टीनें ही सूचना फार मौलिक आहे. आणि येत्या वर्षभरांत देशपांड्यांनीं ह्या एकाच योजनेचा जरी जोमानें पाठपुरावा केला तरी फार महत्वपूर्ण कार्य केल्यासारखा होईल. देशपांडे यांच्या भाषणांत त्यांच्या 'व्यक्तित्वा'चे सारे विशेष प्रत्ययाला येतात ! रंगभूमीवरची नितांत प्रीति हा सर्वश्रेष्ठ गुण विशेष ! !

☆☆

## राजकारण

### कोण म्हणतो "साहेब" गेला ?

**अहो** ! साहेब गेला. १५ ऑगस्ट १९४७ ला त्यानें ह्या देशाला स्वातंत्र्य दिलें. काँग्रेस नामक भारतीय संस्था ठाऊक आहे ना तुम्हांला ? तिचे ते पुढारी—गांधी—नेहरू, पटेल, आझाद, पंत—साऱ्यांच्या साक्षीनें साहेबानें स्वराज्याचें दान केलें. एक तुकडा केला आणि ते आपले मुस्लीम लीगवाले भाई होते कीं नाहीं त्याना दिला आणि दुसरा तुम्हां आम्हांला देऊन टाकला. साहेब म्हणाला होता 'तुम्हीं लायक झाला कीं नाही बाळांनो कीं मी चाललोच माझ्या देशाला परत !' १४ ऑगस्टच्या रात्रीं बारा वाजतां त्याला एकदम साक्षात्कार झाला कीं, आतां ही पामरें स्वराज्याला लायक झालीं. आणि त्यानें









स्वराज्य देऊन टाकलें म्हणाला मुलांनो, सांभाळा हें राज्य ! तुम्हांला आतां ही गाडी खेळायला दिली आहे. रस्ते बांधून दिले आहेत. रूळ टाकून दिले आहेत. सिग्नलस् ठिकठिकाणीं उभे केले आहेत. आतां तुम्हीं ती चालवा. तुम्हींच तिचे ड्रायव्हर आणि गार्डही! आम्हांलाहि खेळणें बरें वाटलें. आम्हीं चालवायला लागलों. साहेब गेल्याचा आनंद झाला. आतां आमचे आम्हींच होतों. आमच्यांत फूट पाडायला, आमचा गैरफायदा घ्यायला, आमच्यां पैशांवर चरून आम्हांला भुकेकंगाल ठेवायला साहेब नांवाचा गोरा गोमटा वरा दिसणारा पण आम्हांला गुलाम ठेवणारा माणूस नव्हता. आम्हीं एकत्र राहणार होतों. आमचें नातें भावंडांचे राहणार होतें. कुणीं जम्मूला राहाणार होता तर कुणीं रामेश्वरला. कुणीं कच्छमध्यें तर कुणीं कलकत्त्याला; पण अखेर सारीं भावंडे म्हणूनच राहणार होतीं. मग आम्हीं कांहीं सोयी केल्या. कांहीं घरणें बांधलीं, चाळी बांधल्या. आणि सोळा वर्षांचा काळ निघून गेला. आम्हीं आतां स्वतंत्र, सार्वभौम झालो होतो. गुलामीचे पुतळे गेले होते. स्वराज्याचा साक्षात्कार घडविणारे नवे पुतळे उभारले गेले होते. सोळा वर्षांनंतर मग नवा विचार करणाऱ्यांची एक बैठक दिल्ली ग्रामीं भरली. सारीं भावंडे एक होती. भाषा वेगळी होती तरी हृदयें एक होतीं. (असें वाटत होतें,असें आतां म्हणावेसे वाटते) हृदयाला समजेल अशा 'आपल्या' भाषेंत बोलूं या म्हणून विचार झाला. एकमत झालें. आणि घोषणा करण्यांत आली. प्रजासत्ताकाच्य वाढदिवशीं ! आणि काय हो चमत्कार ! राष्ट्रीय एकात्मतेचीं लक्तरें मद्रास नामक प्रांताच्या रस्त्यारस्त्यांतून लोळविलीं गेलीं. आगी लागल्या, लूट लुटली गेली, गाड्या जाळल्या, माणसांनीं काय जाळून घेतले. पोलिस अधिकाऱ्यांना काय जाळून मारले, एंजिनें सोडून दिलीं गेली. गाड्या जाळल्या, कचेऱ्या जाळल्या, पोस्ट ऑफिसें जाळलीं गेलीं. फार मोठमोठीं माणसें किती खुजीं, थिटीं आणि संकुचित वृत्तीचीं आहेत ह्याचा प्रत्यय आला. कुणीं अखिल भारतीय राज्यकर्त्या पक्षाचा अध्यक्ष म्हणाला कीं, एका रात्रींत बदल घडणें कठिण आहे. (एका रात्रींत हं ! सोळा वर्षें जणुं यांच्या राजवटींत कधीं चंद्र उगवलाच नाहीं. सूर्य मावळलाच नाहीं) एके काळचे ह्या भारताचे ग. ज. म्हणाले कीं, हिंदीची सक्ति केली तर मी केंद्रापासून फुटून निघण्याचा आदेश दक्षिणेला देईन ! दोन राष्ट्रवादी मंत्र्यांनीं तर साहेबाच्या भाषेसाठीं 'आपल्या' मंत्रिपदाचा म्हणे महान त्याग केला. जणुं मंत्रिपदाच्या 'त्या' बैठकीला ते हजरच नव्हते. त्या निर्णयांत त्यांचे कांहीं अंगच नव्हते. संयुक्त जबाबदारीचे तत्व जणुं मंत्रिमंडळांत नव्हतेंच ! दोन इन्स्पेक्टर जळून देवाघरीं गेले. कुणीं मारलं त्यांना ? त्यांच्याच जातीच्या प्रांताच्या माणसांनीं ! कशासाठीं ! साहेबाच्या भाषेसाठीं ! साहेबाची भाषा जगलीच पाहिजे. आमच्या गाड्या जळतील, तरुण जाळून घेऊन मरतील. आमच्या एकात्मतेचीं लक्तरें रस्त्यावर लोंबतील. आम्हीं गोळ्या झेलून मरून जाऊं. पण साहेबाची भाषा जगवूं. जगवलीच पाहिजे. पूर्वीं तरूण बलिदान पत्करीत ते देशासाठीं. छातीवर गोळ्या झेलीत त्या इंग्रजांच्या बंदुकींतल्या ! स्वतंत्र हिंदुस्थानांतल्या एका प्रांतानें एक नवा व जागतिक इतिहासांत आगळा इतिहास घडविला आहे. चीनच्या सीमेवर हीं माणसें जाळून घेऊन मेली असती तर अवघ्या राष्ट्रानें त्यांचा जयजयकार केला असता. इंग्रजांच्या भाषेसाठीं हीं माणसें बलिदान पत्करतात आणि तरीही त्यांना देशभक्त म्हणायचे ? सतरा वर्षांनंतरही इंग्रजांचे (व इंग्रजीचे) भूत फेकून द्यावें असें स्वतंत्र, सार्वभौम भारतातल्या एका प्रांताला वाटत नाहीं ? हीं माणसें अजूनही साहेबाच्या भाषेसाठीं ह्या राष्ट्राच्या अस्मितेवर, एकात्मतेवर वार करायला सिद्ध होतात ? तरुणांची शक्ति अशी हाराकिरी पत्करूं शकते – साहेबाच्या भाषेसाठीं ? एखाद्या भारतीय भाषेसाठीं भारतीच्या गौरवार्थ हीं बलिदानें पडलीं असतीं तर भारतीची कूस धन्य झाली असती. आम्हीं त्यांचा जयजयकार केला असता. पण मद्रासमध्यें जें घडलें त्याचा गौरव करणें वा त्याच्या विषयीं कांहीं सहानुभूति व्यक्त करणें केवळ अशक्य आहे. अत्यंत निंद्य,घृणास्पद निषेधहि व दंडय वर्तन मद्रासमधल्या विद्यार्थ्यांनीं व त्यांच्या सहप्रवाशांनीं केलें आहे. प्रत्येक राष्ट्राला स्वतःची एक अस्मिता असते. प्राणपणानें ती जपायची असते. हिंदीसारख्या शंभर टक्के भारतीय भाषेबद्दल ह्या देशानें अनेक वार निर्णय घेतले आहेत. इंग्रजी ही सहभाषा म्हणून राहणार असूनही आकसानें जे कांहीं आंदोलन उभारले गेलें. तें केवळ अराष्ट्रीयच नव्हते तर निषेधार्हही होते. एक फार मोठी घातक शक्ति दक्षिणेंत हिंदीचे निमित्त साधून कार्यरत झाली आहे. सौदेवाजीनें हे समंध शांत होणार नाहींत. डावे कम्युनिस्ट आणि घटना जाळण्यांत सतत भूषण मानणारे द्रवीड मुनेत्रचे ह्यांत अंग आहे असे मद्रासचे मुख्य मंत्री म्हणतात. त्यांच्यापासून ह्या देशानें सावध राहण्याची गरज आहे. 'इंग्रजी'चे स्थान डळमळीत होतांच ह्या देशांतील माणसें इतकीं 'अस्वस्थ' होतात हें दृश्य मोठें चिंताजनकही आहे. ह्यांत इंग्रजीचें महत्व कमी लेखण्याचा हेतु नाहीं. पण आपले बापजादे जणुं साहेबाच्याच वंशांत जन्म पावले व म्हणून जगाच्या उद्धारार्थ आम्हीं झालों अशा थाटांत बोलणाऱ्या इंग्रजीच्या भाटांच्या मनोवृत्तीची मात्र कींव येते. ह्या देशांत इंग्रजी फक्त दोनशें वर्षें आली आणि तिनें कितीतरी गुलाम निर्माण केले. धन्य तो साहेब आणि धन्य ते 'साहेबी' देशभक्त ! ! दिल्ली दरबारीं अधिक सावधानतेची गरज आहे, असें आम्हांस वाटतें.

**—सारस्वत**

---

(पान ७२ वरून)

बक्षीस मिळते तो सारा प्रसंग मात्र मोठा करुण गंभीर व मन हेलावून टाकणारा आहे. दोन्ही भागांचे शेवट जोशांनीं चांगले साधले आहेत. प्रकाश योजना व बाळ साठे ह्यांचे वातावरण-अनुकूल व्हायोलिन वादन ह्या दोन गोष्टींची यशस्वी साथ त्यांना मिळते. अखेर कलावंत, लेखक किती मोठा असला तरी तो माणूस असतो. त्याच्या आयुष्यांतला ऊनपावसाचा खेळ तो कसा खेळतो. किती उत्कटतेनें खेळतो ह्यावरच त्याच्या आयुष्याची यशस्विता ठरत असते. अत्रे ह्यांनीं हा खेळ रंगविला आहे. त्यामुळेंच जोशांचा खेळही रंगतो आहे. हास्य आणि अश्रु ही जुळीं भावंडे आहेत. अत्र्यांच्या जीवनांतले प्रसंग निवडतांना जोशांनीं हे नातें ध्यानीं ठेवलें हें उचितच झालें. मला मात्र असें वाटतें कीं, उत्तरार्धात आपण अत्र्यांच्या भाषणांची नक्कलच फक्त पाहतो आहोंत असें जें feeling प्रेक्षकांना येते तें टाळण्याचा प्रयत्न व्हायला हवा. शेवटचें वाक्य हृद्य आहे. मधल्या सगळ्या patches मध्यें मात्र हें feeling येतेंच येतें ! अर्थातच ही स्नेहाची सूचना ! 'once more-अत्रे' म्हणून ह्याचा उत्तरार्ध जोशी सादर करणार असून त्यांत संयुक्त महाराष्ट्र वगैरे भाग येणार आहे असें मी ऐकतों. अत्रे नेहमीं बेचैन, अस्वस्थ असतात. भारावलेल्या मनाचा, कवि प्रकृतीचा भाग तो आहे. ती अवस्था प्रगट होणें, जाणवणें, आवश्यक आहेसें मला वाटतें. जें केलें आहे तेंहीं मोठें आहे म्हणून अभिनंदन – सदानंद जोशी ! !

**—अभिनव गुप्त**

## आम्हीं असें लिहितो

ह्या मुलाखत मालेतील चवथी श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) ह्यांची मुलाखत कांहीं अपरिहार्य कारणामुळें ह्या अंकांत जाऊं शकली नाहीं. ती एप्रिल १९६५ चे अंकांत प्रसिद्ध करीत आहोंत.

त्यानंतरची मुलाखत—
विभावरी शिरुरकर ह्यांची



ऑफिसांत जायचं म्हणजे कसं नीटनेटकं असाय हवं...

# टिनोपालनें शुभ्र कपडे विशेष उजळतात— त्यामुळें आपल्या व्यक्तिमत्वांतहि अधिक भर पडते.

हे सद्गृहस्थ आपल्या वरिष्ठांचे अतिशय आवडते आहेत. ते हुशार आहेत तसेच दिसण्यांतहि तरतरीत आहेत. त्यांचे कपडे पहा कसे पांढरेशुभ्र आहेत. अन् हें आजच नाहीं तर रोज. याचं श्रेय त्यांच्या सौभाग्यवतीला तसंच तें टिनोपाललाहि आहे.

कपडे शेवटीं पाण्यांतून काढाल तेव्हां त्यांत थोडें टिनोपाल घालून पहा सगळे पांढरे कपडे कसे लख्ख उजळून निघतात तें— शर्ट, साड्या, पोलकीं, टॉवेल, मुलांचे कपडे, सगळं कांहीं. अन् इतकं असून या सगळ्याला खर्च कितीं? प्रत्येक कपड्याला एका पैशाहून कमीच. टिनोपाल नेमानें वापरा. नि आपल्या शुभ्र कपड्यांचा शान वाढवा. गांवोगांवच्या चुणचुणीत अन् तरतरीत लोकांची टिनोपाल हीच निवड आहे. टिनोपाल हें आधुनिक प्रकारचें, कपडे शुभ्र करणारं असं साधन आहे.—सर्व प्रकारच्या कपड्यांसाठीं तें विनधोकपणें वापरा.






टिनोपाल हा जे. आर. गायगी, एस. ए. बाल याचा रजिस्टर्ड ट्रेड मार्क आहे.

सुहिद गायगी लिमिटेड, पो. ऑ. बॉक्स ९६५, मुंबई-१ बी. आर.

Shilpi SGT 179 MAR

